| | |
|---|---|
| ब्राह्मी | अनुहोम |
| खरोष्टी | अर्धधनु |
| पुष्करसारी | दरद |
| अंग | स्वास्य |
| वंग | चिन |
| मगध | हूण |
| मांगष्य | मध्याक्षर विस्तार |
| मानुष्य | पुष्पालिपि |
| अंगुली ( आंगठ्यानें लिहिण्याची लिपि. ) | देवलिपि |
| सकारा | नामलिपि |
| ब्राह्मवल्ली | यक्ष |
| द्राविडी | गंधर्व |
| किनारी | किन्नर |
| दक्षिण | महोदव |
| उग्र | असुर |
| चित्रलिपि ( आकृतींची लिपि ) ( Hyro gly ) | गरुड |
| मृगचक्र | गणनावर्त |
| चक्रलिपि | उत्क्षेपवर्त |
| वायुमारुत | निक्षेप वर्त. |
| भोम-देव | पाडलिखि |
| अंतरिक्षदेव | द्विरुचर पदं संधि |
| उत्तर कुरु | यावद् सोत्तर पदसंधि |
| पूर्व विदेही | अध्या हारिपी |
| उत्क्षेप ( लंबाकृती ) | सर्व रूप संग्रहिणी |



इतिहासाचार्यः–विश्वनाथ काशीनाथ राजवाडे.

जन्म आषाढ शु॥ ८ शके १७८५]  [मृत्यू मार्गशीर्ष व॥ १२ शके १८४८

| | |
|---|---|
| ेप ( Pendulues writing ) | विद्यानुलोप |
| ागर | विमिश्रीत |
| त्र | ऋषितपस्तहान |
| ख–पतिलेख | रोचमानान्धरणी-प्रेक्षण |
| नुद्रुत (Slow writing | गगन प्रेक्षिणी |
| ाख्यावर्तलि | सर्वौषधि निस्यन्दर्ती |
| | सर्वसार संग्रहणी |
| | सर्वभूतरुत संग्रहणी |

ह्या चौसष्ट लिपींचें पुढें लिहिल्याप्रमाणें वर्गीकरण करतां येईल. १) देशविषयक=विवक्षित देशांत प्रचलित असलेली लिपि. ( २ ) ातिविषयक=विवक्षित जातींत प्रचलित असलेली. (३) संमिश्र= रगनिराळ्या अक्षरवाटिकांनीं मिश्रित. ( ४ ) सांकेतिक.

यांपैकीं बऱ्याच लिपी प्राचीनकाळांपासून नामशेष झाल्या आहेत. रतखंडांत ऐतिहासिक काळांत सुमारें १४ लिपि प्रचारांत होत्या, सें लिपि शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. त्या येणंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| ाह्मी लिपी | मध्यमदेशी |
| ुप्त | तेलगु–कानडी |
| ुटिल | ग्रंथलिपि |
| ागरी | कालिंग |
| ारदा | तामील |
| गलीय ( Benguli ) | वट्टेळुत्तु |
| श्चिमी | खरोष्ठी |

या १४ लिपींपैकीं ब्राह्मी व तिजपासून निर्माण झालेल्या उपलिपि भरतखंडांतील बहुतेक भागांत अद्याप प्रचलित आहेत. ब्राह्मीलिपि

ब्रह्मदेवानें निर्माण केली म्हणून ती पवित्र मानण्यांत येते. य
लिपीच्या वर्ण मालेंतील पहिले स्वराक्षर 'अ' हें ॐ ह्या प्रणव चिन्हा
पासून अस्तित्वांत आलें; व 'क' हे व्यंजनाक्षर स्वस्तिक 
चिन्हापासून झालें अशी सार्वत्रिक समजूत प्राचीन काळां-
पासून आहे. वर निर्दिष्ट केलेल्या चौदा लिपींपैकीं ब्राह्मी व खरोष्ट
ह्या मुख्य लिपी होत. खरोष्टी लिपी भरतखंडाचे वायव्येकडील प्रांता
म्हणजे पंजाब, गांधार वगैरे देशांत अशोकाचेवेळीं चालू होती. सदरी
प्रांतात अशोकाचे जे शिलालेख सांपडले आहेत ते या लिपींत लिहिले
आहेत. अशोकाच्या पूर्वींचे शिलालेख खरोष्टी लिपिंत लिहिल्या
आढळून येत नाहीं. इराण देशांतील प्राचीनकाळच्या चांदीच्य
नाण्यावर लिहिलेला मजकूर ब्राह्मी व खरोष्टी या दोन्ही लिपींत आहे
अशोकानंतर भरतखंडाच्या उत्तरेकडील कांहीं भागांत विदेशी राजांच
अंमल होता, त्यावेळच्या नाण्यांत, शिक्क्यामोर्तबांत, व शिलालेखां
खरोष्टी लिपीचा उपयोग केला जात होता असें दिसतें. इराण देशां
खरोष्टी लिपि मुख्यत्वें प्रचारांत होती. या लिपीखेरिज "अरमिइन
या नांवाची लिपी इराणदेशांत प्रचलित होती.

वेदकालामध्यें लिपींचे अस्तित्व नव्हतें व पाणिनीच्या ग्रंथां
लिपींचें अस्तित्व सुचविणारा एकही शब्द नाहीं असें मॅक्समुल
साहेबांचें मत आहे. परंतु अलिकडे उपलब्ध झालेल्या पुराव्यावरू
हें मत साफ चुकीचें आहे असें दिसतें. भूर्जपत्र, ताडपत्र
कापसापासून तयार केलेल्या कागदावर लिहिलेला मजकूर हवेमु
बहुत काळ टिकत नाहीं म्हणून दानपत्रें व शासनपत्रें शिलाव
व तांब्याच्या धातूच्या पत्र्यांवर कोरण्याचा प्रघात अशोकाच्य

ठपासून पडला. परंतु यावरून प्राचीन काळीं भरतखंडांतील लोकांस
ागदाची माहिती नव्हती असें म्हणतां येणार नाहीं. दानपत्रें व
जशासनें याखेरीज सर्वसाधारण लेखनव्यवहाराचे कामीं कागदाचा
रयोग केला जात असे यांत शंका नाहीं.

खिस्तपूर्व ३२६ वर्षांत अलेक्झांडर धि ग्रेट् ह्याचा **नियार्कस** या
ावाचा एक सेनापति पंजाबमध्यें होता. त्यानें आपल्या ग्रंथांत असें
टलें आहे कीं, कापूस अगर कापडाच्या चिंध्या कुटून त्यापासून
दुस्थानचे लोक कागद बनवीत असत व कागद करण्याची कला
ास फार वर्षांपासून अवगत होती. मेग्यास्थिनीस ह्यानेंही आपले
थांत वरीलप्रमाणेंच मत नमूद केलें आहे. इसवीसनापूर्वीच्या बौद्ध-
ंथमयांत लेखन-कलेची प्रशंसा केली असून तत्कालीन गृहस्थाश्रमी
ाकांनां ती एक निर्वाहाचें साधन होतें असें म्हटलें आहे.

मिसरदेशांत नाईल नदीकांठच्या दलदलींत पंपासरस ( बोरू;
रकंडा ) यापासून प्राचीनकाळीं कागद तयार करीत असत.
वगिरी येथें कागद तयार करण्याचे कारखाने प्राचीनकाळीं होते,
शी माहिती बऱ्याच ठिकाणीं आढळून येते. दौलताबाद ( मूळचें
वगिरी ) शहरच्या एका भागास कागदपुरा हें नांव अद्यापीहि चालत
ाहे. हिंदुस्थानांत मुसलमानांचा अंमल होईपर्यंत एतद्देशीय लोकांस
ागद हा पदार्थ माहित नव्हता असें जें कांहीं विद्वानांचें म्हणणें
ाहे तें वरील विवेचनावरून चुकीचें आहे असें दिसून येईल.

ब्राह्मी व तीजपासून निर्माण झालेल्या लिपी डावीकडून उजवी-
डे लिहिण्याचा प्रघात आहे. परंतु खरोष्ठी व तिजपासून उपस्थित
ालेल्या लिपी आरबीक, फारशी, हिब्रू वगैरे उजवीकडून डावीकडे

लिहिल्या जातात. खरोष्टी लिपीचा उगम सेमिटिक देशांत ( मध्य एशिया ) झाला असावा असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे.

ब्राह्मी लिपी भरतखंडांत फार वर्षांपासून चालू आहे. तिजपासून गुप्त लिपि बनली गेली. सदरील लिपि गुप्तराजांचे कारकीर्दीत उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक भागांत प्रचलित होती. ब्राह्मी लिपीपासून कुटिल लिपि निर्माण झाली. तिच्या नांवावरूनच तिच्या वैशिष्ट्याचा बोध होतो. ब्राह्मी लिपींतील स्वर, व्यंजनें व मात्रा यांच्या आकृतींत व वळणांत लेखनसौकर्यासाठीं जरूर ते फरक करण्यांत येऊन सदरील लिपी बनविली आहे. हे फरक करतांना वर्णमालेंतील मूळाक्षरांचे वळणांत वक्रता उर्फ वांकडेपणा दिसून येतो म्हणून या लिपीस कुटिल उर्फ मुरडलेली अर्थात मोडी असें म्हणतात. इ. स. ६ व्या शतकांत सदरील लिपी प्रचारांत होती असें दिसतें. कुटिल लिपीला, कायस्थ अगर कैथी लिपि असेंही म्हणतात. कुटिल लिपीपासून मोडी लिपी बनली असावी असें कांहीं विद्वानांचें मत आहे. कुटिल ( संस्कृत ) व मोडी ( मराठी ) हे दोन शब्द एकाच अर्थाचे आहेत. ज्या अक्षराच्या मूळ वळणांत मोड पाडली गेली आहे, अगर जें मुरडलेलें आहे, अशा अक्षरांच्या वर्णमालेस अगर अक्षर-वाटिकेस मोडी अगर कुटिल लिपी असें म्हणतात. विल्हण कवीनें इ. स. ११ व्या शतकांत **विक्रमांकदेवचरित** नांवाचा एक ग्रंथ लिहिला त्यांत कायस्थ लिपीचा त्यानें प्रामुख्यानें उल्लेख केला आहे; तो येणेंप्रमाणें:—

नो कायस्थैः कुटिललिपिभिः नोविटैश्चाटुदक्षैः

( विक्रमाङ्कचरित सर्ग १८ श्लोक ४२ )

यावरून कुटिललिपि हेमाद्रीच्या पूर्वी शेंदीडशें वर्षे तरी प्रचारांत होती असें दिसतें. देवनागरी व कायस्थ लिपि ह्याच्या वळणांत बराच फरक दिसून येतो. मोडी लिपी ही कायस्थ लिपीचें त्याच कालानंतर झालेलें उत्क्रांत स्वरूप होय, असें मानण्यास जागा आहे. **कायस्थ** ह्या नांवाची, लिहिण्याचा व्यवसाय करणारी एक जात भरतखंडांत प्राचीन काळीं होती. निव्वळ लिहिण्याचा धंदा करून उदरनिर्वाह करणाऱ्या आणखी कांहीं जाति भरतखंडांत होत्या. गुजराथेंत ह्याप्रकारची एक धंदेवाईक जात होती, तिला 'धुरु' अथवा 'ध्रु' असें म्हणत. कायस्थामध्यें **करण** ह्या नांवाची एक पोटजात होती, तिला **करणिक** अथवा **कर्णिक** (संक्षिप्त रूपांत कर्ण) असें म्हणत. कनोजच्या राजाचें दफ्तर ठेवणाऱ्या अधिकाऱ्यास "कायस्थ" अथवा "करणिक" अशी संज्ञा असे. यावरून "कर्ण" अथवा "करणिक" या शब्दाचा अर्थ राजकीय व्यवहाराचे कागदपत्र सांभाळणारा अंमलदार असा अर्थ निष्पन्न होतो व करणांचा अधिप (करणाधिप) यास दफ्तरदार असें म्हणण्यास हरकत नाहीं.

वरील विवेचनावरून कायस्थ, कर्ण अथवा करणिक हे शब्द निव्वळ धंद्याचे निदर्शक आहेत; जातिवाचक नाहींत असें दिसून येईल. अमोघवर्षाच्या कारकीर्दींत या कायस्थांचा राजकीय कागदपत्र लिहून घेण्याचे कामीं उपयोग करीत असत. अमोघवर्ष राजाच्या वेळच्या एका लेखावरून कायस्थ हे हिंदुस्थानच्या दक्षिणभागांत धंद्या निमित्त आले होते असें दिसतें. अमोघवर्ष राष्ट्रकूट ह्याच्या कारकीर्दींत **वाल्ह व कायस्थ** यांस जो आश्रय मिळाला होता तो

त्याच्या नंतरच्या राजांनीं कायम ठेविला असें पुढील उताऱ्यावरून दिसतें.

**लिखितं चैतद्वल्लभकायस्थवंशजातेन धर्माधिकरणस्थेन भो.**

आमचा चरित्रनायक हेमाद्रि हा देवगिरीच्या यादवांचे दरबारांत करणाधिपाचे हुद्यावर होता ही गोष्ट निर्विवाद आहे. वरील विवेचनावरून करणाधिपाच्या हुद्याच्या कार्यक्षेत्रावर बराच प्रकाश पडतो.

ब्राह्मी लिपीपासून नागरी उर्फ देवनागरी लिपी इ. सन ६ व्या शतकांत निर्माण झाली असावी. राष्ट्रकूटवंशीय दंतिदुर्गराजाच्या वेळचा इ. स. ७५४ तील शिलालेख या लिपींत कोरलेला उपलब्ध आहे. देवनागरी लिपी लिहिण्यांत सुबक व सुवाच्य असल्यामुळें ती भरतखंडांत सर्वत्र लोकप्रिय झाली व प्राचीन काळापासून संस्कृत भाषेंत रचिलेले बहुतेक सर्व ग्रंथ याच लिपींत लिहिलेले आहेत. यादवांचे राजवटींत देवनागरी हीच लिपी प्रचारांत होती. हेमाद्रि व बोपदेव ह्यानीं लिहिलेले संस्कृत ग्रंथ देवनागरी लिपीतच आहेत. तसेंच रामदेवराव जाधवाचे राजवटींत सनातन हिंदुधर्मीयांनीं अगर महानुभावपंथीयांनीं मराठींत लिहिलेले सर्व ग्रंथ देवनागरी लिपींतच आहे.

हेमाद्रि हा करणाधिपाचे हुद्यावर असतानां यादवांच्या राज्याचा विस्तार फार वाढला होता; त्यामुळें दरबारचा राजकीय पत्रव्यवहार मोठ्या प्रमाणावर करणें ओघानें प्राप्त झालें होतें. हात न थांबवितां एका लेखणीच्या टाकानें थोड्या वेळांत पुष्कळ मजकूर लिहितां येईल अशा लिपीची हेमाद्रीस जरुरी भासली असल्यास नवल

हीं. हेमाद्री हा स्वतः विद्वान् लेखक असल्यामुळें खाजगी
व्यवहार मोठ्या प्रमाणावर करण्याचा प्रसंग त्यास वारंवार आला
मला पाहिजे. तेव्हां सुलभ रीतीनें अल्पावधींत पुष्कळ मजकूर
लिहितां येईल अशी एखादी लघुलिपी नव्यानें शोधून काढण्याची,
गर या नमुन्याची पूर्वी अस्तित्वांत असलेली एखादी लिपी प्रचारांत
आणण्याची कल्पना त्याच्या सुपीक व कल्पक डोक्यांतून निघाली
असल्यास आश्चर्य नांहीं !

हेमाद्री ह्याचें संस्कृत भाषेवर प्रभुत्व होतें ही गोष्ट त्यानें रचिलेल्या
अनेक ग्रंथावरून दिसून येते. अनेक लिपींत लिहिलेले संस्कृत
ग्रंथ त्यांच्या नजरेखालून गेले असले पाहिजेत, ही गोष्ट त्यानें
'चतुर्वर्गचिंतामणि' मध्यें श्रुति, स्मृति, पुराणें वगैरे शेंकडों ग्रंथां-
तील उतारे दिले आहेत यावरून सिद्ध होते. त्याच्या दांडग्या विद्या-
व्यासंगावरून, ब्राह्मी लिपीपासून निर्माण झालेल्या बहुतेक लिपी
त्याच्या नेहमींच्या परिचयातील असाव्या असें दिसतें.

या लिपींपैकीं पश्चिमी व कुटिल लिपि या, मोडी लिपीच्या धर्ती-
वर होत्या म्हणजे ह्या लिपींत हात थांबविल्यावांचून एका लेखणीच्या
झोकानें थोडक्या वेळांत पुष्कळ मजकूर लिहितां येत असे. पश्चिमी
लिपी कोंकणामध्यें इ. स. ५ व्या शतकांत प्रचलित होती असें
कांहीं ग्रंथावरून दिसून येतें. कोंकणप्रांत भरतखंडाच्या पश्चिम भागांत
असल्यामुळें तिला पश्चिमी असें म्हणत. **कायस्थ** ऊर्फ **कायथ**
अथवा **कैथी** ही नागरी लिपीचें परिवर्तन होऊन तयार झाली आहे.
कायस्थांचे लेखनकलेंत पिढीजाद प्रावीण्य असल्यामुळें त्यांनीं ह्या
लिपीस, शीघ्रता व सुलभता आणिली होती ह्यांत संशय नाहीं

हेमाद्रीच्या फडणीशी खात्यांत अशा लिपींत निष्णात असलेले बरेच लोक नोकरीवर असले पाहिजेत त्यांच्या लिपींत, शीघ्रता, सुलभता वगैरे विशिष्ट गुण असल्याचें हेमाद्रीचे निदर्शनास आल्यामुळें तिचा राजकीय व खाजगी व्यवहारांत उपयोग करण्याचें त्यानें ठरविलें असावें हें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें.

देवनागरीच्या एकंदर वर्णमालेंतील कांहीं वर्णांस एकप्रकारचें विशिष्ट वळण देऊन मोडी लिपी तयार झाली आहे. ही गोष्ट पुढें दिलेल्या तिच्या मूळ व विकृत स्वरूपावरून दिसून येईल.

### देवनागरी

अ, आ, इ, ई, उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः

𑘀 𑘁 𑘂 𑘃 𑘄 𑘅 𑘆 𑘇 𑘈 𑘉 𑘊 𑘋 𑘌 𑘍 𑘀𑘽 𑘀𑘾

या स्वर मालेंत फक्त **चार** स्वरांस मात्र विशिष्ट वळण दिलेलें आहे.

| देवनागरी. | विकृत स्वरूप मोडीमध्यें |
|---|---|
| क ख ग घ ङ | 𑘎𑘏𑘐𑘑𑘒 |
| च छ ज झ ञ | 𑘓𑘔𑘕𑘖𑘗 |
| ट ठ ड ढ ण | 𑘘𑘙𑘚𑘛𑘜 |
| त थ द ध न | 𑘝𑘞𑘟𑘠𑘡 |
| प फ ब भ म | 𑘢𑘣𑘤𑘥𑘦 |
| य र ल व श | 𑘧𑘨𑘩𑘪𑘫 |
| ष स ह ळ | 𑘬𑘭𑘮𑘯 |
| क्ष ज्ञ | 𑘎𑘿𑘬𑘕𑘿𑘗 |

वरील कोष्टकावरून क वर्ग, च वर्ग, व ट वर्ग, ह्यांपैकीं एक वर्गांतील फक्त दोन अक्षरांस मुरडलेलें वळण दिलें आहे. वर्गांतील तीन, प वर्गांतील चार, व य, र, ल, व या अंतस्थ र्गांतील सर्व अक्षरांस, तसेंच श, ष, स, ह ह्या उष्मन् वर्गांतील न अक्षरांस विशिष्ट वळण दिलेलें आहे. एकंदर तीस अक्षरांपैकीं क १९ अक्षरांसच विशिष्ट वळण दिलें आहे.

वरील विवेचनावरून 'मोडी' ही स्वतंत्र लिपी नसून देवनागरीची ागर कुटिल लिपीची एक उपलिपी आहे असें सिद्ध होतें. अशा ऱ्हेच्या उपलिपी देशकालपरत्वें प्रत्येक देशांत प्राचीनकाळीं होत्या व र्तमानकाळींही अस्तित्वांत आहेत. मोडी लिपी, यक्षिणीची कांडी फरवून एकाएकीं तयार झालेली नाहीं. तसेंच ती पैदा करण्यांस सिंहल-ापास उर्फ लंकेस जाण्याची कोणासही जरूरी नव्हती. हेमाड्रीला मोडी ' लिपी आणण्यासाठीं लंकेस जावें लागलें असें विधान करणें ्हणजे त्याच्यासारख्या लोकोत्तर विभूतीचा अपमान करणें होय !!

**ब्राह्मी लिपी**:—पूर्वी निर्दिष्ट केलेल्या चौदा लिपींपैकीं गुप्त, ुटिल, नागरी, शारदा, ग्रंथ, कलिंग, पश्चिमी व मध्यमदेशी या, ब्राह्मीचीं विकृत रूपें होत. ग्रंथलिपी मद्रास इलाख्यांतील अर्काट, त्रिचनापल्लि, सालेम, मदुरा वगैरे ठिकाणीं प्रचलित आहे. कलिंग लिपी ही मद्रास इलाख्यांतील गंजम वगैरे प्रांतांत प्रचारांत आहे. तामील ही मलबार प्रांतांत प्रचलित आहे. वटेळुत्तु ही तामील लिपीची एक पोटलिपी आहे.

इसवी सनाच्या आठव्या शतकांत शारदा-लिपि, ही काश्मीर व ंजाबप्रांतांत प्रचलित होती. **शारदा**-लिपीपासून **ठाकरी** नांवाची एक

शीघ्र उपलिपी निर्माण झाली. कैथी अगर मोडी लिपीप्रमाणें अल्पावधीं पुष्कळ मजकूर लिहिण्याचे कामीं या लिपीचा उपयोग करीत. वंगलीय लिपि बंगालप्रांतांत प्रचलित होती. बद्दाल येथील एका स्तंभाव नारायणपालच्या काळचा एक लेख या लिपींत कोरलेला आहे वंगलीय लिपीपासून नेपाळी, मैथिली, उरिया व बंगालप्रांतांत हल्लीं प्रचलित असलेली बंगाली लिपी ह्या निर्माण झाल्या.

**कैथी** अथवा कायथ ( कायस्थ ) लिपी ही नागरीचें परिवर्तन होऊन बनली आहे. कुटिल व कैथी या लिपींचा परस्पर निकट संबंध आहे. **कैथी** ही जलद लिहिण्याची लिपी आहे. संस्कृतांतील संपूर्ण वर्णमालेचा उपयोग या लिपींत करतां येत नाहीं. ऋ, लृ, ञ न, व अगर ब या वर्णांत कांहीं फरक नाहीं. अ, ख, थ हीं अक्षरें नागरीपासून भिन्न आहेत. मोडी लिपीही कैथी अथवा कायस्थ लिपीपासून फारशी भिन्न नाहीं.

फारशी भाषेंत **नस्ख** व **शिकस्ता** अशा लिहिण्याच्या दोन पद्धति आहेत. ग्रंथ रचनेच्या कामीं ज्या लिपीचा उपयोग केला जातो त्या पद्धतिला **नस्ख** अशी संज्ञा आहे. व जलद लिहिण्याच्या पद्धतीस **शिकस्ता** असें म्हणतात. इंग्रजीं भाषेंत ग्रंथ लिहिण्याचे कामीं रोमन लिपिचा उपयोग करितात. जसें:-A, B, C, D, E F G, H, वगैरे. परंतु पत्रव्यवहाराचें कामीं ज्या लिपीचा उपयोग केला जातो तिला *Italics* असें म्हणतात, जसें:-*abcdefgh* म्हणजे रोमन लिपि ही फारशी भाषेंतील **नस्ख** पद्धति होय; व *Italics* ही **शिकस्ता** पद्धति होय. याप्रमाणें दरएक भाषेंत, ग्रंथ लिहिण्याची लिपि, व्यवहारांतील कागदपत्र लिहिण्याचें कामीं उपयोगांत येत असलेल्या लिपीपासून भिन्न असते.

इतिहासाचार्य राजवाडे ह्यांच्यामतें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञाने-
र्गच्या तेराव्या अध्यायांत मोडी लिपीचा अप्रत्यक्ष रीतीनें उल्लेख
ला आहे. तो येणेंप्रमाणें:—

हें वहू असो. पंडित् धरुनु बालकाचा हातू
वोळा लेहे वेगवंतू आपणचि ।

या ओवींतील वेगवंतू हें पद फार महत्वाचें आहे असें राजवाडे
ंचें मत आहे. बालबोध अक्षर वेगानें लिहितां येत नाहीं, तेव्हां
ा लिपीसंबंधानें वेगवंत हा शब्द योजण्यांत विशेष अर्थ नव्हता.
पद मोडी अक्षराच्या संबंधानें मात्र सार्थ आहे. यावरून श्रीज्ञाने-
रीच्या **पूर्वी** मोडी अक्षर प्रचारांत आलें होतें असें राजवाडे अनु-
ान काढितात. हेमाद्री व ज्ञानेश्वर महाराज हे समकालीन होते.
व्हां हेमाद्रीच्यापूर्वी मोडी लिपि अस्तित्वांत होती हें उघड दिसतें.
ावरून मोडी लिपीचें जनकत्व हेमाद्रीकडे येत नसून ती त्यानें महा-
ाष्ट्रांत राजकीय व खाजगी कागद पत्र लिहिण्याचे कामीं नव्यानें
चारांत आणिली ह्याच मतास पुष्टि मिळते.

मराठ्यांच्या इतिहासाची साधनें या ग्रंथाच्या आठव्या खंडांत
तिहासाचार्य राजवाडे यांनीं मोडी लिपीसंबंधानें आपले विचार
गट केले आहेत ते येणेंप्रमाणें:—

"ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शके १२१२ ( इ. स. १२९० ) मध्यें
लिहिला गेला. हेमाद्री हा इ. स. १२६० पासून देवगिरीच्या जाध-
ांचा दफ्तरदार होता. हेमाद्री हा दफ्तरदार होण्याच्या पूर्वी उत्तर
हिंदुस्थानांत मुसलमानांचें राज्य होऊन ८०-९० वर्षें झालीं होतीं.
संघण राजानें माळवा वगैरे विंध्याद्रिच्या पलिकडील प्रांत जिंकून

घेतले होते तेव्हां मुसलमानांची व म्लेंच्छांची ओळख मराठ्यां
झाली होती. ही ओळख होत असतांना मुसलमानांची कागद क
ण्याची कला महाराष्ट्रांत सुरू झाली; व ही सुरू झाल्यावर मो
लिहिण्याची पद्धत हेमाद्रीला सुचली. ही मोडी लिहिण्याची पद्ध
हेमाद्रीनें मुसलमानांच्या **शिकस्ता**नामक पद्धतिवरून घेतली. फा
र्शीत लिहिण्याच्या पद्धति अनेक आहेत; त्यांत **नस्ख** व **शिकस्त**
ह्या पद्धति आपल्याकडील बालबोध व मोडी ह्या पद्धतिशीं जुळता

नस्ख अक्षर बालबोधीप्रमाणें स्पष्ट व सुवाच्च असें लिहा
लागतें. व शिकस्ता अक्षर मोडून लिहिलेलें असतें. जलदीनें लि
ण्यांत खंडें अक्षर मोडून लिहिण्याचें जें वळण त्याला फारशी
**शिकस्ता** म्हणतात. मोडी हा शब्द फारशी **शिकस्ता** ह्या शब्दा
हुबेहुब भाषांतर आहे. मोडी ह्या शब्दाचा वाचक शब्द संस्कृत
अगर महाराष्ट्रांत नाहीं. हा शब्द हेमाडपंतानें फारशी शिकस
या शब्दाच्या अर्थाकडे लक्ष देऊन मराठींत अक्षर लिहिण्याचा ए
पद्धतीला नव्यानें लागू केला. हेमाडपंतानें अक्षर लिहिण्यांत ही न
सुधारणा केली तोंपर्यंत महाराष्ट्रांत सर्व लेखी व्यवहार बालबे
अक्षरांत होत असे. मोडी लिहिण्याचा प्रघात आज ६५० वर्षें च
असतां भरतखंडांतील इतर कोणत्याही भाषेला हा प्रघात उच
ण्याची आवश्यकता दिसली नाहीं. कागदावर लिहिण्याचा प्रघ
पडल्याबरोबर मोडी लिहिण्याचाही प्रघात महाराष्ट्रांत लवकरच पडल
व हा प्रघात पाडण्याचें प्रथम श्रेय जाधवांचा दफ्तरदार जो हेमा
त्यांस विद्वत्तेच्या व अधिकाराच्या बळावर सहजासहजी घेतां आ
मोडी अक्षर देवनागरी अक्षरें मोडून तयार केलें आहे, हें चार पा

पूर्वीचीं जुनीं पत्रें व महजर पाहिले म्हणजे सहज दिसून येतें."

इतिहासाचार्य राजवाडे यांनीं वरील विचारसरणींत बऱ्याच गोष्टीं हेत धरल्या आहेत त्या येणंप्रमाणें:—

( १ ) मुसलमानांचा हिंदुस्थानांत प्रवेश होण्यापूर्वीं कागदाची हिती एतद्देशीय लोकांस बिलकूल नव्हती.

( २ ) कागदावर लिहिण्याचा प्रघात पडल्याबरोबर, मोडी लिहिण्याचाही प्रघात महाराष्ट्रांत लवकरच पडला.

( ३ ) हेमाद्रीचे वेळीं फारशी भाषेचा प्रसार महाराष्ट्रांत ाला होता.

( ४ ) हेमाद्रीस फारशी भाषेचें उत्तम ज्ञान होतें.

वरील विधानास राजवाडे यांनीं कांहींएक आधार दिले नाहींत. लट अलेकझांडर धि ग्रेट ह्याचा सेनापति नियार्कस यानें हिंदुथानांत कापूस अगर चिंध्या कुटून कागद फार प्राचीन काळापून तयार करीत व तो लिहिण्याच्या उपयोगांत आणीत असे पल्या ग्रंथांत ख्रिस्तपूर्व सुमारें तीनशें वर्षांच्या पाठीमागें लिहून वलें आहे. ग्रीक व चिनी लोकांनींही हिंदुलोकांस कागद तयार करण्याची कला फार प्राचीनकाळापासून अवगत होती असें आपल्या वासवर्णनांत लिहून ठेविलें आहे. यावरून मुसलमानांनीं हिंदुस्थानच्या लोकांस कागदाची ओळख प्रथम करून दिली ह्या म्हणण्यांत तथ्य नाहीं. फारशी भाषेचा प्रवेश दक्षिणेंत तेरावें शतकांत अगर त्यापूर्वीं झाल्याबद्दलची माहिती कोणत्याही ग्रंथांत उपलब्ध नाहीं. हेमाद्रीस फारशी भाषा अवगत होती व हेमाद्रीनें मोडी लिहिण्याची पद्धत मुसलमानांच्या शिकस्तानामक लेखनपद्धतीवरून

घेतली या विधानास राजवाडे यांनी कांहींएक आधार दिला नाहीं
उलट, संस्कृत भाषेंत ब्राह्मी, देवनागरी, वगैरे लिपींवरून अनेक उप
लिपी कालांतरानें निर्माण झाल्या व त्यांत पश्चिमी, मध्यमदेशी, कुटि
कैथी, टाकरी, वगैरे जलद लिहिण्याच्या लिपी हेमाद्रीच्या पूर्वी हिंदु
स्थानांत अस्तित्वांत होत्या अशी माहिती लिपिशास्त्रावरील ग्रंथां
मिळते. 'मोडी या अर्थाचा वाचक शब्द संस्कृतांत नाहीं; व तो शब्
हेमाडपंतानें फारशी **शिकस्ता** या शब्दाच्या अर्थाकडे लक्ष देऊ
मराठी अक्षर लिहिण्याच्या एका पद्धतीला नव्यानें लागू केला, अ
राजवाडे यांचें म्हणणें आहे. परंतु सदरील विधानें वस्तुस्थितीस धरू
नाहींत. संस्कृतांत कुटिल हा शब्द मोडी शब्दाचा वाचक आहे
'कुटिल' म्हणजे वांकडा, मुरडलेला, मोडलेला; 'मोडी' ह
'कुटिल' शब्दांचें मराठींत हुबेहुब रूपांतर होय.

हेमाद्रीचा विद्याव्यासंग दांडगा होता ह्यामुळें तत्कालीन वेगवेगळ्य
लिपींतले ग्रंथ त्याच्या वाचण्यांत आले असले पाहिजेत. एखादी नव
लिपी शोधून काढण्यास अगर प्रचारांत आणण्यास फारशी भाषेंती
लेखनपद्धतिकडे धांव मारण्याची त्यास जरूरी नव्हती. देवनागरी लिप
जलद लिहिता यावी म्हणून तिला वळण देण्याचें यत्न लेखनकलें
निष्णांत अशा कायस्थांकडून, फारशी भाषेचा हिंदुस्थानांत प्रवेश
होण्यापूर्वी चालू होते, वगैरे हकिगतीचा पूर्वीं उल्लेख येऊन गेला आहे.

हेमाद्रीनें मोडी लिहिण्याची पद्धति लंकेहून आणिली. ह्या दंतकथे
बद्दल इतिहासाचार्य राजवाडे ह्यांचें मत पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:-

'देवगिरीच्या जाधवांचें साम्राज्य सर्व दक्षिणभर कन्याकुमारी
पर्यंत होतें हें प्रसिद्ध आहे. साम्राज्यांतील दप्तरें तपासल्यास कन्या

गरी किंवा रामेश्वर ह्या दक्षिणेकडील प्रांतांत जाऊन व कदाचित् कची यात्रा करून परत आल्यावर सर्व दफ्तर मोडींत लिहिण्याचा हुकूम हेमाद्रीनें काढला असावा असें दिसतें. लंकेहून परत याला व हा नवा वटहुकूम काढण्याला एकच गांठ पडल्यामुळें केचा व मोडी अक्षराचा लोकांनीं विनोदानें संबंध जोडून दिला सेल असें वाटतें. बाकी लंकेंतील त्यावेळच्या सिंहलीभाषेचा व डीचा कांहीं संबंध होता ह्याला बिलकूल प्रमाण नाहीं.'

वरील उतार्‍यांतील प्रत्येक विधान कल्पनेच्या पायावर रचलेलें सून त्यास इतिहासाचा आधार नाहीं. देवगिरीच्या यादवांचा अंमल, सूर व कर्नाटक या प्रांताच्या दक्षिणेकडील प्रांतावर होता असें दाख- णारा एकही शिलालेख अगर ताम्रपट उपलब्ध नाहीं. हेमाद्रीच्या तचें, अगर देवगिरीच्या यादवांच्या दफ्तरांतील मराठींत लिहिलेलें कही चिटोरें उपलब्ध नाहीं. त्यानें तयार केलेलीं मेस्तकेंही उपलब्ध हींत. हेमाद्री हा दरबारचे कामासाठीं यादवांच्या राज्यांत दौर्‍या- र निघाल्याबद्दलचा कोठें उल्लेख नाहीं. त्याचे वेळचा एकही वटहुकूम पलब्ध नाहीं. हेमाद्रीनें मुक्ताफल ग्रंथावर लिहिलेल्या कैवल्यदीपिका मक टीकेंत, अगर त्याच्या चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथांतही याबाबतींत कांहींएक उल्लेख केलेला आढळत नाहीं. इतिहाससंशोधनाच्या बाबतींत कल्पनाशक्तीस स्वैरक्रीडा करूं देणें केव्हांही चांगलें नाहीं.

लंकेंत मोडी–लिपी प्रचारांत नव्हती; त्याठिकाणीं बौद्धधर्मांतील हीनयान पंथ चालू होता: व तेथील सिंहली भाषेचा मोडी लिपीशीं कांहींएक संबंध नव्हता, असें राजवाडे कबूल करितात.

मोडी लिपीच्या जनकत्वासंबंधानें सुमारें तीस चाळीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत मोठा वाद उपस्थित झाला होता. इतिहासाचार्य राजवाडे व प्रोफेसर रा. रा. भागवत वगैरे विद्वान् गृहस्थांच्या मतें हेमाद्रीनें सदरील लिपी शोधून काढली. सदरील मत प्रस्थापित करण्यासाठी इतिहासाचार्य राजवाडे यांनीं त्यावेळीं जीं कारणें दिलीं होतीं, तीं त्यांनीं आपल्या म. इ. साधनें या ग्रंथाच्या ८ व्या खंडांत विस्तृत रूपानें नमूद केली आहेत. परंतु तीं, इतिहास व युक्तिवाद यांचे कसोटीस उतरत नाहींत हें दाखविण्याचा आम्हीं यथामति प्रयत्न केला आहे.

रा. ब. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं Indian Antiquary नांवाच्या इंग्रजी नियतकालिकांत सुमारें २५ वर्षांपूर्वी एक लेख लिहून त्यांत श्रीशिवाजीमहाराजांचे चिटणीस बाळाजी आवजी यांनीं मोडी लिपी इ. स. १५६५ त प्रथम शोधून काढली असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या मताचें समर्थन करण्यासाठीं त्यांनीं जीं कारणें दिलीं आहेत तीं येणेंप्रमाणें:–( १ ) श्रीशिवाजीमहाराजांचे पूर्वींचा एकही मोडी लेख उपलब्ध नाहीं; ( २ ) पंढरपूरच्या देवळांतील जमाखर्ची लेखांत मोडी लिपीचा मागमूस नाहीं; व (३) प्राचीन ताम्रपटांत, मोडी लिपी आढळत नाहीं. नाशिक येथील तीर्थोपाध्ये वे. गिरिधर ऊर्फ गिरीभट क्षेमकल्याणी यांचेकडे जुन्यांत जुनी वही त्यास सरकारमार्फत मिळाली होती. त्यांत ८५ मोडी लेखांपैकीं ८० लेख कायस्थ प्रभूंचे निघाले. जुन्यांत जुना मोडीलेख शके १५६५–इ. स. १६४३ पलिकडला नाहीं. असें या वह्यांच्या संशोधनांत निष्पन्न झालें. बाळाजी आवजी यांचे वडील जंजिऱ्याचे शिद्याचे नोकरीं-

मतां, त्यास आपल्या यजमानाबरोबर दिल्लीदरबारांत पुष्कळ वेळां ण्याचा प्रसंग येत असे. तेथें असतांना फारशी भाषेंतील जलदी हिण्याच्या **शिकस्ता** पद्धतीच्या वळणावर मोडी लिपीची कल्पना नें प्रथमच काढली' व देवनागरी लिपींत योग्य फरक करून टणीशी वळणाची नवी लिपी बनविली असें रा. ब. गुप्ते यांनीं या वांत म्हटलें आहे. फारशी भाषेंतील **शिकस्ता** पद्धतीवरून 'मोडी' पीची कल्पना निघाली याबाबतींत मात्र राजवाडे व गुप्ते यांचें कमत दिसतें. परंतु तिच्या जनकत्वासंबंधानें त्यांच्यांत मतभेद हे. राजवाडे यांचे मताप्रमाणें मोडी–लिपीची कल्पना पहिल्या- थम हेमाद्रीनें काढली. रा. ब गुप्ते यांच्या मताप्रमाणें 'कारकुनी शाचे आदिस्थानीं विराजमान असलेले राजकारणी खरे सूत्रकार ळाजी आवजी यांनीं आपल्या बुद्धिकौशल्यानें मोडी लिपी शोधून ाढली व श्रीशिवछत्रपतीनें ती प्रचारांत आणली.' आमच्या मतें । वादांत शास्त्रीयसंशोधनापेक्षां उभयपक्षीं ज्ञातिविषयक वृथा- नमानाची छटा दिसून येते.

भरतखंडांत मुसलमानांचा प्रवेश होण्यापूर्वी, ब्राह्मी, देवनागरी, गैरे एतद्देशीय प्राचीन लिपींमध्यें कालपरत्वें जीं परिवर्तनें अगर रफार झाले त्यांचा सूक्ष्म रीतिनें अभ्यास केल्यानें व निरनिराळ्या पींत वेळोवेळीं कसकसे फेरफार झाले याचें मनन केल्यानें या ादग्रस्त विषयाचा निकाल सहज लागणार आहे.

लिपिशास्त्राच्या अनुरोधानें आम्हीं या भागांत जें विवेचन केलें ाहे. त्यावरून राजवाडे व गुप्ते यांचीं मतें विचारांत घेण्यास फार अडचणी येतात. पेशवाईंत, या मोडी लिपीस आणखी एक प्रकारचें

नवीन वळण मिळालें, व तें ‘ बिवलकरी ’ वळण या नांवानें प्रसिद्ध आहे. खुद्द हेमाद्रीच्या वेळचा मोडी लेख उपलब्ध झाल्यास त्यांत व हल्लींच्या मोडीच्या स्वरूपांत बराच फरक असल्याचें दिसून येण्याचा संभव आहे.

मोडी हा शब्द मौर्य–मौर्यी–मोडी–मोडी या परंपरेनें सिद्ध झाला असें मानून ही लिपी मौर्यराजा चंद्रगुप्त व त्याचा नातु अशोक ह्यांचे राजवटींत बनली असें आंग्ल विद्वानांचें मत आहे. परंतु अलिकडे लिपिशास्त्रावर तज्ञांनीं सोपपत्तिक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांचा अभ्यास करून या बाबतींत अधिक संशोधन करतां येण्याजोगें आहे.

लेखनकलेंत फार प्राचीनकाळापासून निष्णात असलेल्या कायस्थानी देवनागरीस एक प्रकारचें वळण अगर लपेट देऊन लिहिण्याचे कामीं तिला सुलभता आणली व अशा तऱ्हेची लिपी हेमाद्रीचे वेळीं अस्तित्वांत होती असें पूर्वीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. व्यवहारदक्ष हेमाद्रीनें ती फक्त प्रचारांत आणली असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

मोडी लिपी बंद करून मराठी प्रांतांतील सर्व कोर्टांतील व्यवहार बालबोधींत चालवावे असा मुंबई सरकारनें कांहीं वर्षांपूर्वीं वटहुकूम काढला होता. त्यावेळीं बालबोध अक्षर कितीही जलदीनें लिहिलें तरी त्याला मोडी लिपीची सर येत नाहीं असें दिसून आलें. शिवाय अशा रीतीनें जलद लिहिलेलें लिखाण अत्यंत दुर्बोध होत असे, असा कटु अनुभव आल्यामुळें सरकारास आपला वट हुकूम परत घेणें भाग पडलें. हेमाद्रीनें मोडी लिपी स्वतः तयार केली याबद्दल कांहींएक ऐतिहासिक पुरावा नाहीं. शिवाय मोडींत लिहीलेलें तत्कालिन एकही लिखाण अस्तित्वांत नाहीं. सबब या बाबतींत साधार पुरावा पुढें येईपर्यंत

ंपरागत आलेल्या गोष्टीवर अथवा दंतकथेवर भरंवसा ठेवणें योग्य
सत नाहीं.

इ. स. १७३९ तील मोडी लिपीचा मासला म्हणून थोरल्या ाजीरावाचे धाकटे बंधु चिमणाजी आप्पा यांचें स्वदस्तुरचें मोडींत हिलेले पत्र पुढें दिलें आहे:—

श्री

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

वरील मोडी लिपीचें देवनागरींत रूपांतर.

श्री.

अखण्डित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री अन्ताजी रघुनाथ गोसावी यांसी:–

सेवक चिमणाजी बल्लाळ नमस्कार सुरुसन सलासिनमया व अलफ तुम्हीं पत्र पाठविलें ते प्रविष्ट जाहलें. लेखनार्थ विस्तारें कळला.

शियास मुख्य भावार्थ कीं, अवघा प्रसंग सत्य भासून कर्तव्य सेल तें तर्साच आज्ञा करावी नाहीं तरी दुरांशेंत गुतावें सारिखें ाहीं म्हणून लिहिलें; ऐशियास अवघा प्रसंग तुम्हीं प्रत्ययास आणून ला आहे. त्यास अनृत्य काये निमित्य भासेल. अवघा प्रसंग त्यच आहे. व कार्यही कर्तव्य आहेच आहे. तुम्हीं चित्तांत संशय ाणोवा ऐसा अर्थ नाहीं. कर्णाजी शिंदे यांजकडून मनुश्य देविलें आले नाहीं म्हणून लिहिलें, त्यास मनुश्याविसी पहिलें लिहिलें ोतें: हलींही लिहिले आहे. ते मनुश्य देतील. जाणिजे छ २२ ाबान आज्ञांकित.



## भाग ७ वा.

### महानुभाव–पंथीय मराठी वाङ्मय.

सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा ॥
स्वर्गापवर्गं मध्दाम कथंचिद्यदि वाञ्छति ॥ १ ॥
नैरपेक्ष्यं परं प्राहुर्निःश्रेयसमनल्पकम् ॥
तस्मान्निराशिषो भक्तिर्निरपेक्षस्य मे भवेत् ॥ २ ॥
एवमेतान्मयादिष्टाननुतिष्ठति मे पथः ॥
क्षेमं विंदन्ति मत्स्थानं यद्ब्रह्म परमं विदुः ॥ ३ ॥

श्रीमद्भागवत ( एकादश स्कंध अ. २० )

नानामतें पाखांडें । कर्मठता अति वाडें ।
त्यांचीं ठेंचावीं तोंडें । हरिभजनें ॥ ३ ॥
जें जें हरीचें लिलाचरित । तें तें माझेंचि स्वतंत्र ।
देव भक्त एकत्र । भेद नाहीं. ॥ ४ ॥
जो जो अवतार हरी धरी । तो तो मीच अवधारीं ।
हरिनाम गजरीं । जगदोद्धारी ॥ ५ ॥
सर्वांभूतीं भगवद्भावो । हा भक्तीचा निजनिर्वाहो ।
धर्माचा आग्रहो । वाढणें ॥ ६ ॥
सर्वांभूतीं दया शांती । प्रतिपाळावी वेदोक्ति ।
हेंचि एक निश्चिती । करणें आह्मां ॥ ७ ॥
लीलाविग्रही भगवंत । तया म्हणती नित्यमुक्त ।
आह्मां काय तेथें । वेगळे असों ! ॥ ८ ॥ ( एकनाथ )

भरतखंडांत श्रुतिकालापासून, सृष्टीची उत्पत्ति कशी व केव्हां झाली ? तिचा उत्पादक कोण ? आत्मा नित्य कीं अनित्य ? जीवात्मा व परमात्मा यांचे परस्पर संबंध काय आहेत ? वगैरे गहन विषय

े तत्कालिन तत्त्ववेत्त्यांचें लक्ष वेधलें होतें. ह्या विषयावर चिकि-
कबुद्धीनें विचार करून तत्कालिन ऋषींनीं जे सिद्धांत ठरविले
त्यांनीं आरण्यकें, ब्राह्मण, उपनिषदें वगैरे ग्रंथांत लिहून ठेविले
हेत. ज्या त्या तत्त्ववेत्त्यानें आपापल्या दृष्टीनें ह्या आध्यात्मिक
षयांचा अनेक बाजूंनीं विचार केला होता, त्यामुळें त्यांच्या-
यें एकवाक्यता दिसून येत नाहीं. ह्या मत-वैचित्र्यामुळें एकाच
षयासंबंधानें अनेक तत्त्ववेत्त्यांचीं भिन्न भिन्न मतें असलेलीं दिसतात.
हींच्या मतें, एका अगम्य व अनिर्वचनीय शक्तीच्या योगानें सृष्टि
र्माण झाली असून तिचें चालकत्व या शक्तीकडे आहे. या मताचे
कांस सेश्वरवादी म्हणतात. उलट पक्षीं, सृष्टीची उत्पत्ति स्वयंभू
रून निसर्गाच्या कांहीं ठराविक नियमान्वयें तिचे व्यापार सुरळितपणें
लतात; आणि प्रत्येक सृष्ट पदार्थास उत्पत्ति, स्थिति व लय
ून दरएक स्थितींतून त्यास क्रमाक्रमानें जावें लागतें, असें
ल्येकांचें मत आहे. या मतवाद्यास निरीश्वरवादी ( पाखंडी ) असें
णतात. ब्रह्मसूत्रकार, योगसूत्रकार व नैय्यायिक ह्यांची गणना
श्वरवाद्यांत होऊं लागली. सांख्य, वैशेषिक, लोकायतिक
चार्वाकमतानुयायी ) ह्यांचा अंतर्भाव निरीश्वरवाद्यांत होऊं लागला.
र्व उपनिषदांचें सार जी श्रीमद्भगवद्गीता, तिच्यांत ईश्वराचें आस्तिक्य
तिपादिलेलें असून सकृद्दर्शनी भिन्न दिसणाऱ्या सांख्य व योग
यांचा गीताकारानें समन्वय करण्याचा प्रयत्न केला आहे. निरीश्वर-
द्यांना श्रीमद्भगवद्गीतेंत बिलकुल थारा नाहीं. गीताकाल व ख्रिस्ति-
र्माचा उदय यांचे दरम्यान जो काल गेला त्यांत जैन, बुद्ध वगैरे
र्मांची स्थापना झाली. या दोनही धर्मांचे संस्थापकांना वेदाचें

प्रामाण्य, ईश्वराचें आस्तिक्यमणि वर्णाश्रमधर्म हीं संमत नसल्यामु
त्यांची गणना निरीश्वरवाद्यांत होत असे.

खुद्द वेदान्तमतवाद्यांत दोन मुख्य पक्ष निर्माण झाले. अद्वैतवादी
द्वैतवादी; अद्वैतवाद्यांत, केवलाद्वैती व विशिष्टाद्वैती असे दोन पोट भा
निर्माण झाले. श्रीमच्छंकराचार्य हे केवलाद्वैती मताचे पुरस्कर्ते होते
श्रीरामानुजाचार्य हे विशिष्टाद्वैतमताचे प्रवर्तक होते. श्रीमध्वाचार्य
श्रीवल्लभाचार्य हे द्वैतमतवादी होते. श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्य
लोकोत्तर बुद्धिमत्तेच्या व तर्कशास्त्राच्या जोरावर अद्वैतमताचें मंड
करून, सांख्य, वैशेषिक, जैन, बौद्ध, चार्वाक् वगैरे अवैदिक मतां
खंडण केलें. व एकंदर जनसमूहांत आपल्या अद्वैतमताचा पगडा बस
विला. त्यामुळें त्यास **जगद्गुरू** ही पदवी प्राप्त होऊन भरतखंडाच्य
चार दिशेस आचार्यांच्या चार मठांची स्थापना झाली. ही गो
सन इ. स. ७ व्या अथवा ८ व्या शतकांत घडून आली.

वेदांतमताच्या प्रसारामुळें जैन व बौद्धधर्मास उतरती क
लागली. परंतु त्यामुळें सदरील धर्मांचें भरतखंडांतून उच्चाटन झा
अशी जी सार्वत्रिक समजूत आहे ती बरोबर नाहीं. बौद्धधर्म
अहिंसा, भूतदया, विश्वबंधुत्व व समाजसेवा वगैरे उदात्त तत्वांच्य
पायावर उभारलेला असून, सनातन हिंदुधर्मांतील पुनर्जन्म, पूर्वक
शील, प्रज्ञा, समाधि वगैरे तत्वें त्यास मान्य होतीं. बौद्धधर्म भरत
खंडांत सुमारें हजारबाराशें वर्षे प्रचलित असल्यामुळें अहिंस
विश्वबंधुत्व वगैरे त्यांतील विशिष्ट मतें सामान्य लोकांत दृढमूल झाल
होतीं. या परिस्थितीमुळें सनातन वर्णाश्रमधर्माच्या मूळस्वरूपां
बराच ढिलेपणा आला होता.



महाराष्ट्र–सारस्वत–मयूर.

कै. विनायक लक्ष्मण भावे.

न्म ६–११–१८७१ ] [ मृत्यु १२–९–१९२६

इ. स. आठव्या व नवव्या शतकांच्या दरम्यान श्रीमद्भागवत-
ण रचलें गेलें. असें विद्वान लोकांचें मत आहे. ह्या पुराणाच्या रचना-
ळासंबंधानें अद्याप एकमत नाहीं. परंतु श्रीमदाद्यशंकराचार्यांचे
ोदर सदरील पुराण अस्तित्वांत नव्हतें, ही गोष्ट निर्विवाद
. इ. स. आठव्या शतकाच्या सुमारास भरतखंडांत निरनिराळे
व पंथ प्रचलित होते. भागवतकारांनीं दशावताराच्या कल्पनेनें
सर्वांचें मोठ्या खुबीनें एकीकरण करण्याचा प्रयत्न केला व तो
याच अंशानें सिद्धीस गेला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.
दाहरणार्थ **रामायणांत** ज्या **गौतमबुद्धास** चोर असें म्हटलें आहे,
था चोरस्तथा बुद्धः) त्याचा भागवतकारांनीं दशावतारांत समावेश
ला आहे. ही विचारक्रांति होण्यात कोणतीं कारणें झालीं अस-
ल याचा सर्वधर्मांचा तौलनिक रीतीनें अभ्यास करणारांनी
Students of Comparative religions ) अवश्य विचार
रावा.

श्रीमद्भागवतपुराण हा ग्रंथ श्रीमद्भगवद्गीतेची आधुनिक काली-
ल सुधारलेली आवृत्ति होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं.
दरील पुराणांत श्रीकृष्णाच्या कथानकास व त्याच्या अतर्क्य
ीलांच्या वर्णनास प्राधान्य दिलें असून तो परमेश्वराचा पूर्णावतार
ता असें प्रतिपादन केलें आहे. सनातन वैदिक धर्माच्या मूळ स्वरू-
स धरून निव्वळ भक्तीच्या जोरावर परमेश्वरप्राप्ति करून घेतां
तें, असें या पुराणांत प्रतिपादिलें आहे. परमेश्वराच्या स्वरूपाचें
ान भक्तिमार्गानें करून घेणें हा भागवत पुराणाचा मुख्य विषय
सून सर्व गोष्टी दुय्यम प्रतीच्या मानिल्या आहेत. वर्णाश्रमधर्म हे

भागवतधर्माचें सर्वस्व नसल्यामुळें त्याचें उल्लंघन या धर्माच्या आ येत नाहीं. एकंदरीत भागवत पुराणांतकर्माला गौणपणा दिले असून तांत्रीक उपासना पद्धतीला प्रामुख्य दिलें आहे असें दिसते सामान्यजनांनीं आपल्या उपास्य देवतेची अन्यभावनेनें पू करून त्याचें गुणानुवाद गावे व ते नित्य श्रवण करावें व सदाचरणा वागावें अशी भागवतधर्माची शिकवण आहे. भगवंताविषयीं प्रेम भक्ती अशा रीतीनें उत्पन्न होऊन ती स्थिर झाल्यावर, त्याचें खं स्वरूप कळूं लागतें; व त्या स्वरूपाची जाणीव झाल्यावर त्याचेविषय भक्ति उत्पन्न होऊन तिजमध्यें जीव पूर्णपणें नित्य रंगून जातात हरिगुण-गायन हेंच त्यांच्या आयुष्याचें इतिकर्तव्य होतें. अजा मिळ, प्रल्हाद, उद्धव, अक्रूर, सुदाम वगैरे भक्तांच्या उदाहरण वरून, भागवतकारांनीं सदरील तत्व लोकांच्या मनावर ठसविण्याच प्रयत्न केला आहे. अखिल भूतमात्र हेंच परमेश्वराचें स्वरूप हो असें ओळखून सर्वांकडे समदृष्टीनें पाहणें हेंच श्रेष्ठ भक्तीचें लक्ष होय, असें भागवतांत प्रतिपादिलें आहे. शालिवाहान शकाच्य बाराव्या शतकापर्यंत भरतखंडांत वैष्णव, शैव, वीरशैव ( लिंगायत शाक्त ( वाममार्गी, अघोरी पंथ ), नाथपंथ वगैरे नानाविध पं अस्तित्वांत होते.

हेमाद्री हा शके ११७१ पासून देवगिरीचा यादवराजा महादेवरा व रामदेवराव जाधव यांचे राजवटींत करणाधिपाचे हुद्यावर असतान महाराष्ट्रांत आणखी एका नव्या पंथाची भर पडली. देवगिरी यें अगर त्याच्या आसपासच्या प्रांतात श्रीचक्रधर नांवाचा निवृत्तिमार्ग महाराष्ट्रीय ब्राह्मण राहात होता. तो पूर्ण वैराग्यशील असू

कृष्णाचा निस्सीम भक्त होता. त्याचा पूर्वाश्रमीचा इतिहास उपलब्ध
डॉ. **भावे** यांच्या ' **महाराष्ट्र सारस्वतां**'त अगर श्रीयुत **यशवंत**
गोपाल देशपांडे यांच्या '**महानुभवीय**-मराठी-वाङ्मय' नांवाचे ग्रंथांत
याचें त्रोटक चरित्र दिलें आहे. परंतु तें सांप्रदायिक स्वरूपाचें असल्या-
मुळें इतिहासाच्या कसोटीस कितपत उतरेल याबद्दल शंका आहे.
शके ११८५ चे सुमारास त्यास श्रीदत्तात्रयांचा साक्षात्कार होऊन त्यानें
त्यास दीक्षा घेतली. श्रीकृष्ण हा पूर्णावतार असून त्याची अव्यभिचारी
भक्ति केल्यानें मोक्षप्राप्ति त्वरित होते असें त्याचे ठाम मत होते. त्यानें
श्रीकृष्ण उपासना, अहिंसा, भूतदया व वैराग्य वगैरे विषयांवर लोकांस
उपदेश करण्याचा उपक्रम केला. तीव्र विरक्ति सदाचारसंपन्नता,
श्रीकृष्णावरील अढळ भक्ति, सर्व प्राणिमात्राविषयीं भूतदया व समाज-
सेवा वगैरे त्याचे अंगी असलेल्या अलौकिक गुणांमुळें सर्व प्रकारच्या
लोकांवर त्याची छाप तावडतोब बसली. गौतम बुद्धाप्रमाणें लोकांच्या
नेहमीच्या बोलण्याच्या भाषेंत उपदेश करण्याचा व ग्रंथ लिहिण्याचा
यानें उपक्रम केल्यामुळें, त्याच्या मताचा फैलाव असंख्य लोकांत
झाला. सनातन वैदिक धर्मांतील कांहीं विद्वान् लोक त्याचे पट्टशिष्य
बनले. भागवतपुराणांतील मुख्य तत्वें या पंथास मान्य असल्यामुळें
श्रीचक्रधराचा उपदेश सामान्य जनास सहज पटूं लागला. आपल्या
मातृभाषेंत भागवतधर्माच्या उच्चतत्वांनें भरलेलें उपदेशामृत प्यावयास
मिळाल्यामुळें, सामान्य जनास मोक्षाचेंद्वार अनायासें खुलें झालें असें
वाटूं लागलें. श्रीचक्रधर स्वामीचा शिष्य-सांप्रदाय फार वाढल्यामुळें
दूरदूरचे लोक त्याचे अनुयायी बनले. या सांप्रदायास " **महानुभाव**
अथवा **महात्मापंथ** असें नांव पडलें. या पंथाचें उपास्य दैवत

केवळ **श्रीकृष्ण** असल्यामुळें या सांप्रदायास **जयकृष्णीपंथ** असें म्हणतात.

देवगिरीचा यादवराजा कान्हेर अगर कन्हरदेव हा आपल धाकटा भाऊ महादेव यांस बरोबर घेऊन श्रीचक्रधरस्वामीचे भेटीस गेला होता असा उल्लेख लीलाचरित्रांत केलेला आहे. कन्हरदेवां स्वामींस दक्षिणा म्हणून बरेंच द्रव्य देऊं केलें असतां त्यांनें स्वीकारण्याचें नाकारिलें. त्यामुळें स्वामींच्या निस्पृहतेबद्दल व कड कडीत वैराग्याबद्दल यादवराजाची खात्री झाली.

रामदेवराव जाधवाचे राजवटींत महानुभावपंथाचा व तत्पंथीय वाङ्मयाचा अनपेक्षित रीतीनें उत्कर्ष झाला याची कारणें पूर्वी (भा. १ पृ.१९४-१९५ मध्यें) दिलीं आहेत. महानुभावीय ग्रंथकारांस राजाश्रय मिळाल्यामुळें त्यांनीं मराठी भाषेंत मोठ्या प्रमाणावर ग्रंथरचना केली सदरील पंथाच्या अनुयायांमध्यें प्रतिभासंपन्न ग्रंथकार व कवि बरेच निर्माण झाले. श्रीज्ञानेश्वरमहाराजाचे जन्मापूर्वी या पंथाचा लीलाचरित्र नांवाचा धर्मग्रंथ लिहिला गेला असें म्हणतात. प्रस्तुत ग्रंथाच्या २०९ पृष्ठावर यादवकालीन महानुभावीय ग्रंथाची यादी दिली आहे तिजवरून ज्ञानेश्वरीच्यापूर्वी महानुभाव पंथाचे कांहीं ग्रंथ लिहिले गेले असावेत असें दिसतें. देवगिरीच्या यादवांचें राज्य नष्ट झाल्यावरहि या पंथांत नाणावलेलें कवि व ग्रंथकार बरेच निर्माण झाले; व त्यांनीं मराठी वाङ्मयांत चांगली भर घातली. या वाङ्मयांतील ग्रंथांची संख्या सुमारें ४ पासून पांच हजार असावी असा अंदाज आहे. व त्यांत श्रेष्ठ दर्जाचे ग्रंथ बरेच आहेत असें भावे व देशपांडे यांचे मत आहे. इ. स. १९०७ सालापर्यंत विवेकसिंधु व ज्ञानेश्वरी हे मराठी

ङ्मयांतील आद्यग्रंथ समजले जात असत. येवढें मोठें मराठी ङ्मय सुमारें ६००-७०० वर्षें कालाच्या उदरांत कसें दडून हिलें व तें एकाएकी उजेडांत कसें आलें याबद्दल पुष्कळ लोकांस चंबा वाटतो. प्रस्तुत लेखकाचा या प्रश्नाशीं निकट संबंध सल्यामुळें त्याचा वृत्तांत थोडक्यांत पुढें देण्यांत येत आहे. त्याव-न या प्रश्नाचा उलगडा सहज होईल.

पुणें येथील रहिवाशी ब्रह्मीभूत विष्णुबुवा जोग हे वारकरी पंथा-कीं एक प्रमुख होते. इ. स. १९०७ सालीं पूर्वखानदेशांतील एण-ांव येथें एका कीर्तनप्रसंगीं त्यांनीं महानुभावपंथाच्या उत्पत्तीबद्दल, ाटमाळ विधानें करून मदरील पंथाची मोठ्या जनसमूहापुढें दनामी केली. त्याचा सारांश असा कीं, कृष्णंभट नांवाच्या एका ाह्मणानें एका मांग जातीच्या स्त्रीबरोबर लग्न केलें; व या संबंधा-सून त्यास चार मुलगे झाले; त्यांपैकीं एकाचें नांव मांगभाव असें तें. त्याजपासून मांगभाव–मानभाव–महानुभाव पंथाची उत्पत्ति ाली. अशा तऱ्हेची या पंथाची नालस्ती केल्यामुळें खानदेशांत हानुभाव पंथीय भिक्षूंस भिक्षा मिळण्याचें बंद झालें; व त्यांचेबद्दल ाकांचें मनांत असलेला आदर कमी झाला. महानुभावपंथातील प्रमुख डळींनीं विष्णुबुवा जोग ह्यांजवर जळगांव येथें मेहरबान बोलस् ाहेब यांचे कोर्टांत आपल्या पंथाची बदनामी केल्याबद्दल फौज-ारी खटला केला. त्याकामीं फिर्यादी महानुभावांतर्फे पुण्याचे सुप्र-सिद्ध वकील कै. रा. ब. आपटे, व प्रस्तुत लेखक काम चालवीत ाते. फिर्यादी तर्फेच्या साक्षीच्या यादींत लोकमान्य टिळक यांचे ांव होतें. परंतु त्यांच्या पुराव्याची जरूरी न भासल्यामुळें कोर्टानें

जोगांवर इं. पी. कोड ५०० अन्वयें महानुभाव-पंथाची बेअ
केल्याबद्दलचा आरोप ठेविला. आरोपीतर्फे पुरावा घेण्याची तारीख
नेमिली होती त्या दिवशीं त्यांचेतर्फे काम चालविण्यास मुंबईती
एक युरोपियन सॉलिसिटर हजर झाले. त्यांनीं इंपीरियल गॅझे
टिअर व्हाल्यूम १२ पृ. ८२ मध्यें महानुभावपंथासंबंधीं सरकारी
रीत्या जी हकीकत प्रसिद्ध झाली होती ती कोर्टाच्या नजरे
आणिली. आरोपीनें केलेली विधानें या हकीकतीशीं जुळत असल्या
मुळें आरोपीस त्याचा फायदा मिळून कोर्टानें त्यास दोषमुक्त केले
खटल्याचा निकाल झाला त्यादिवशीं विष्णुबुवा जोग यांचे नेतृत्व
खालीं त्यांचे वारकरी अनुयायांनीं महानुभावास खिजविण्याकरि
जळगांव येथें एक प्रचंड मिरवणूक काढिली होती. सदरील खटल्याच
प्रतिकूल निकालामुळें खानदेशांतून आपलें उच्चाटन होईल कीं का
अशी महानुभावीयांना मोठी दहशत पडली !!

बिनसरकारी फौजदारी खटल्यांत आरोपीवर कोर्टानें आरोप ठे
ल्यानंतर तो क्रि. प्रो. कोडच्या विवक्षित कलमाखालीं दोषमु
झाल्यास फिर्यादीस त्या निकालावर अपील करण्याचें कामीं कायद्याच
फार अडचणी असतात. यामुळें जोगांच्या विरुद्ध वरिष्ट कोर्टाकडे अप
करण्यांत आलें नाहीं. पूर्व खानदेश जिल्ह्याचें त्यावेळचें कलेक्टर मेहे
बान् सिन्कॉक्स् यांचेकडे या निकालाविरुद्ध फिर्यादीतर्फे तपासणी अ
करण्यांत आला होता. परंतु त्याकामीं त्यांस यश आलें नाहीं. याप्रम
कायद्यानें आपला बचाव करून घेण्याचे सर्व मार्ग खुंटल्या
महानुभवपांची अत्यंत निराशा झाली.

इंपीरिअल गॅझेटिअर व्हा. १२ पा. ८२ मध्यें महानुभाव-पं
संबंधीं दिलेला मजकूर सपशेल खोटा आहे असें ठरवून त्याऐव

रील पंथाची साधार माहिती प्रसिद्ध केल्यांवाचून या वादाचा यमचा निकाल लागणार नाहीं अशी प्रस्तुत लेखकानें महानुभाव- ाचे पुढारी महंतास सल्ला दिली, व ती त्यांस पसंत पडली. हा हेतु द्ध व्हावा म्हणून महानुभावीय धर्मग्रंथावरून व अन्य पुराव्यानें ंरिअल गॅझेटिअर ज्या विद्वान् गृहस्थांच्या नेतृत्वाखालीं सरकारा- डून प्रसिद्ध केलें जात होते त्यांची खात्रीकरून देणें जरूर होते. कामीं मदत करण्यासाठीं रामचंद्रबुवा वडगांवकर, जामोदकरबुवा गेरे महानुभव पंथाचे पुढाऱ्यांनीं आपलेबरोबर जरूर ते ग्रंथ आणून ामचे येथें बरेचदिवस वास्तव्य केलें. त्यांच्या मदतीनें प्रस्तुत खकानें इंग्रजी भाषेत विस्तृत निबंध तयार केला. ईंपीरिअल झेटिअरमध्यें या पंथाबद्दल दिलेली माहिती सपशेल खोटी होती सें सदरील ग्रंथावरून आम्हांस दिसून आलें.

त्यावेळीं मुंबईचे कलेक्टर ए. एम. टी जॅक्सन या नांवाचे एक ंग्लिलीयन होते. त्यांचें संस्कृत भाषेवर प्रभुत्व असून शिवाय मराठी ाषेवर प्रेम होतें. कै. विनायकराव भावे यांचें " महाराष्ट्र वि " ह्या नांवाचें मासिक तें मोठ्या आस्थेनें वाचीत असत. त्यांनीं त्तरकोकणांतील folklore या नांवाचें पुस्तक मोठ्या परिश्रमानें यार करून छापिलें. निरनिराळ्या इंग्रजीनियतकालिकांत त्यांनीं व्द्वत्ताप्रचुर लेख प्रसिद्ध केले होते, त्यावरून त्यांची गणना विद्वा- ांत होत असे. फावल्यावेळांत प्राचीन-इतिहाससंशोधनाचें काम । आस्थापूर्वक करीत असत. प्रस्तुत लेखकानें उपरिनिर्दिष्ट निबंध ाहेबमजकुरांस दाखविला. त्यांनीं महानुभावयि मूळ ग्रंथांतील ंमर्पक उतारे स्वतः वांचून निबंधांतील मजकुराच्या खरेपणाबद्दल

खात्री करून घेतली. महानुभावीय वाङ्मयांत श्रीमद्भगवद्गीतेव
**कैवल्यदीपिका** या नांवाची संस्कृतांत लिहिलेली टीका आहे, तं
त्यांचे अवलोकनांत आली; व ती त्यांस फार आवडली. इंपी
रिअल गॅझेटिअरमधील महानुभावपंथासंबंधानें प्रसिद्ध झालेल
खोडसाळ मजकूर काढून टाकण्याबद्दल त्यांनीं मे. एन्थोव्हेन् या
एक शिफारस पत्र लिहिलें. मे. एन्थोव्हेन साहेब यांनीं याकामं
बरीच सहानुभूति दाखविली. परंतु सदरील विषय ज्यास प्राची
मराठी भाषा नीट समजत असेल त्याचा असून, आपणांस याबाबतीं
कांहीं करितां येत नाहीं असे त्यानीं मोठ्या दिलगिरीनें कळविलें
नंतर सदरील लेख व महानुभावीय ग्रंथ डॉ. भांडारकर ह्यां
प्रस्तुत लेखकानें दाखवून, याकामीं मदत करण्याबद्दल त्यास विनं
केली. डॉ. रामकृष्णपंतानीं आम्हीं तयार केलेलें टांचण
महानुभावीय ग्रंथ आपलेपाशीं ठेवून घेतले; व गुप्तलिपींतील मजक
समजून घेण्यासाठीं महानुभावीय महंतास पुणें येथें राहण्या
सांगितलें. डॉ. भांडारकरांनीं त्यांच्या ग्रंथाचें निरीक्षण करून ए
स्वतंत्र लेख तयार करून तो टाईम्स ऑफ इंडियामध्यें प्रसिद्ध केला
महानुभावपंथासंबंधानें सरकारी रीतीनें प्रसिद्ध झालेली हकीक
खोडसाळ व निराधार आहे असें त्यांनीं आपलें ठाम मत दिलें. त्यांच्य
परिश्रमाचें फळ मुंबई एथ्नालॉजिकल मालेंतील ( Ethnologica
Survey Series ) १३१ नंबरचा मोनोग्राफ् हें होय. सर रामकृ
पंत भांडारकर यांच्या परिश्रमामुळें महानुभावपंथासंबंधानें खरी
ऐतिहासिक माहिती इंपीरिअल गॅझिटिअर व्हॉ. १३ मध्यें प्रसि
करण्यांत आली. याप्रमाणें महानुभाव पंथासंबंधानें जो अन्या

ण्यांत आला होता तो दूर झाला. व त्याची वेळीं अवेळीं बद-
मी करण्यांत उद्युक्त असलेल्या विरोधी पक्षाचें तोंड कायमचें
द झालें.

मेहरबान जॅक्सन साहेब, डॉ. भांडारकर व त्यास मदत करणारे
हस्थ यांचे महानुभावपंथीयांनीं तत्कालीन दैनिक पत्रांतून कृतज्ञ-
द्धीपूर्वक आभार मानिले. जळगांव नजिक भादली गांव आहे तेथें
हानुभावपंथाचा एक मठ आहे. त्या ठिकाणीं महानुभावीय महंतांची
प्रस्तुत लेखकाची एक बैठक होऊन त्यांत महानुभावीय वाङ्मयाचें
काद्या महाराष्ट्रभाषाभिज्ञ गृहस्थाकडून संशोधन करवून ते प्रसिद्ध
करण्याचें बहुमतानें ठरलें. व याकामीं ठाणें येथील आमचे सहा-
याथी मित्र व महाराष्ट्र भाषेचे निस्सीम भक्त के. विनायक लक्ष्मण
ावे यांचें नांव आम्हीं साहजिकच सुचविलें. विनायकराव भावे यांनीं
ाणें येथें मोठ्या परिश्रमानें मराठीग्रंथसंग्रहालयाची स्थापना करून
ा महाराष्ट्र कवि नांवाचें मासिक स्वतःच्या हिंमतीवर काढून मराठी
ाषेविषयीं आपलें निनांत प्रेम व्यक्त केलें होतें. शिवाय पुणें येथील
ारतइतिहाससंशोधकमंडळांत त्यांनीं बरेंच निबंध वाचून इतिहासिक-
संशोधन भारत-इतिहास-संशोधक-मंडळाचें कामीं आपली पात्रता
विद्वान लोकांच्या निदर्शनास आणिली होती. यामुळें भादली येथें ठर-
लेली योजना पार पाडण्यास विनायकराव भावे हे पूर्णपणें लायक होते
अशी प्रस्तुत लेखकाची प्रामाणिक समजूत होती. विनायकराव भावे
यांस भादली येथील बैठकींत ठरलेली योजना प्रस्तुत लेखकानें कळ-
विली व ती मान्य करण्याबद्दल त्यांस विनंति केली. एकाद्या मनुष्यास
भूमिगतद्रव्य ( Treasure Trove ) हस्तगत झाल्यानें जसा

अत्यानंद होतो त्याप्रमाणें महानुभावीयवाङ्मयभांडार आपल्या हातीं आल्याबद्दल विनायकराव भावे यास आनंद झाला. भावे ह्यांनी महंत दत्तराज व इतर महंत यांच्या सहाय्यानें ह्या वाङ्मयाचें संशोधनदृष्ट्या निरीक्षण करून त्याबद्दल एक निबंध मुंबई येथील मराठी ग्रंथसंग्रहालयांत वाचला. त्यानीं अत्यंत परिश्रम करून हें वाङ्मय उजेडांत आणण्याचें श्रेय संपादिलें, व **महाराष्ट्र सारस्वत** ग्रंथ प्रसिद्ध करून आपली कामगिरी जगाच्या निदर्शनास आणिली. महानुभावपंथीय वाङ्मयाचें अज्ञात दालन कसें खुलें झालें याची मूळ पीठिका विस्तारपूर्वक देण्यांत विषयांतर झालें आहे याची आह्मास जाणीव आहे. परंतु ह्याबाबतींत कोणकोणाकडून कसकशी मदत झाली ह्याची साधारण कल्पना वाचकांना व्हावी म्हणून ती देण्यांत आली आहे? याबद्दल वाचक वर्गाची क्षमा मागणें जरूर आहे कार्यकारण न्यायानें अगर स्थूल दृष्टीनें पाहिलें असतां हे वाङ्मय उजेडांत आणण्यास ब्र. भू. विष्णुबुवा जोग हे कारणभूत झाले ही गोष्ट विसरता कामा नये. सर डॉ. रामकृष्ण भांडारकर ह्यांनीं ह्या पंथाच्या वाङ्मयाचें आस्थापूर्वक व सहानुभूतिपूर्वक संशोधन करून, या पंथाच्या उत्पत्तिसंबंधानें इंपीरियल गॅझेटिअरमध्यें पूर्वी प्रसिद्ध झालेले लेख निराधार व खोडसाळ असें ठरवून त्याऐवजी साधार माहिती प्रसिद्ध केली व या पंथासंबंधाने लोकांचे मनांत उत्पन्न झालेला गैरसमज दूर केला. सदरील पंथाबद्दल ऐतिहासिक माहिती प्रसिद्ध करून सर रामकृष्ण पंतांनी महानुभावीयपंथीयास कायमचे उपकृत केल्यामुळें, त्या उपकाराची फेड म्हणून त्यांनीं आपले पूर्वग्रह बाजूस ठेवून आपल्या पंथाचें वाङ्मय प्रकाशित करण्यास

पत्नी संमति दिली. ह्यावरून या पंथाचें वाङ्मय उजेडांत आण-
ाचें मुख्य श्रेय डॉ. भांडारकर यांस देणें वाजवी आहे.

महानुभाव पंथाचा संस्थापक श्रीचक्रधर ह्याजबद्दल ऐतिहासिक
हिती उपलब्ध नाहीं. परंतु या पंथाच्या सांप्रदायिक ग्रंथात जी
जविषयीं माहिती दिली आहे ती कै. विनायकराव भावे ह्यांनीं
पल्या ' महाराष्ट्रसारस्वतांत ' दिली आहे. तिचा सारांश येणें-
णें:— सुमारें आठशें वर्षांपूर्वी त्रिमल्लदेव नांवाचा राजा होऊन
ा. त्याचा प्रधान विशालदेव नांवाचा एक सामवेदी ब्राह्मण होता.
मल्लदेव निपुत्रिक असल्यामुळें त्यानें आपलें सर्व राज्य विशाल-
ास दिलें. या विशालदेवासही फार दिवस संतान नव्हतें म्हणून
नें श्रीदत्तात्रयाची आराधना केली. त्याच्या कृपेनें त्यास एक पुत्र
ला. त्याचें नांव त्यानें हरपाळ असें ठेविलें. तो फार तैल बुद्धीचा
ून सात्विक स्वभावाचा होता. विशालदेवानें त्यास राज्यकारभार कर-
ाचें कामीं आपल्या मदतीस घेतलें. परंतु त्यास द्यूत खेळण्याचा नाद
का लागला कीं त्यानें आपलेंजवळचें सर्व द्रव्य गमाविलें. हें व्यसन
ं वाढत वाढत इतक्या थरापर्यंत गेलें कीं राज्यकारभारांत तो लक्ष
ीनामा झाला. त्यास कमलादेवी नांवाची सुशील पत्नी होती. तिला
कदपटशा देऊन तिजकडून द्रव्य घेऊन द्यूत खेळण्याची आपली
स पुरविण्यापर्यंत त्याची मजल गेली. अखेर तिनें आपलें जवळचें द्रव्य
ण्याचें नाकारिलें. त्यामुळें त्यानें अन्नत्याग केला. त्याचा बाप विशा-
देव व आई मल्हाणदेवी ह्या उभयतांनीं त्यास आपला हट्ट
डण्याविषयीं मोठ्या काकुळतीनें सांगितलें. परंतु तो आपला हट्ट
डिना. अखेरीस पुत्रवात्सल्यामुळें त्यास द्रव्य देऊन आपल्या

मुलाचा निदान त्या दिवसापुरता हट्ट पुरविणें त्यांना भाग झालें.

हरपाळदेव ह्यास कांहीं कालानें विरक्ति उत्पन्न होऊन त्याचे मनांत रामटेकची तीर्थयात्रा करण्याचें आलें. त्यानें आपला मनोदय आपल्या आईस कळविला. त्यावेळीं विशालदेवाचें व देवगिरीचे यादव ( जाधव ) याचे दरम्यान युद्ध चालू होतें. त्यामुळें आपला राजपुत्र हरपाळदेव हा जाधवांचें तडाक्यांत सांपडेल म्हणून विशालदेवानें त्यास जाण्याची मनाई केली. परंतु हरपाळदेव रामटेक येथे जाण्याबद्दल आपला दुराग्रह सोडीना. सबब त्याजबरोबर निवडक लोक देऊन यात्रेकरूच्या साध्या पोषाकांत त्यास पाठविण्याचे त्याच्या आईबापानीं ठरविलें. रस्त्यांत त्याची व त्याजबरोबर असलेल्या निवडक लोकांची चुकामूक झाली व हरपाळदेव हा रामटेकचा रस्ता सोडून ऋद्धिपुराकडे वळला व तेथें जाऊन पोहोंचला. तो दिवस शके ११०७ विश्वावसू संवत्सर चैत्र शु. १५ होता, अशी नोंद या पंथाच्या धर्मग्रंथात आहे. त्यावेळीं ऋद्धिपूर येथें श्रीगोविंदप्रभु नांवाचा पूर्ण वैराग्यशील विद्वान ब्राह्मण अयाचित वृत्तीनें राहात होता. हरपाळानें त्यांची गांठ घेतली व त्यांच्या सन्निध तो कांहीं दिवस राहिला. श्रीगोविंदप्रभूनें, त्यास मंत्रोपदेश देऊन त्याचें नांव 'चक्रधर' असें ठेविलें. सदरील गोविंदप्रभूबद्दल थोडीशी माहिती स्थान पोथींत दिली आहे. प्रभू हें आडनांव ब्राह्मणांतही असल्यामुळें तो ब्राह्मण असावा असें वाटतें. हरपाळदेवानें कांहीं वर्षें अशा स्थितींत काढल्यावर औरंगल येथील कमलनाइक नांवाच्या एका सामवेदी ब्राह्मणाच्या मुलीबरोबर त्यानें लग्न केलें. ती फार रूपवती व विदुषी असून तिचें नांव हंसांबा असें होतें. विवाहाचा काल शके ११२

् संवत्सर ज्येष्ठ शुद्ध ७ मीस गोरज मुहूर्तावर होता. परंतु हा
ाहिक संबंधही फार दिवस टिकला नाहीं. वैराग्याच्या भरांत चक्रधर
ापलें घरदार सोडून पुनः तीर्थयात्रेस निघाला. तीर्थयात्रा करीत
मतां तो एलिचपूर (अचळपूर) येथें गेला तेथें रामदेवोराऊ
ाणा या नांवाचा एक स्वतंत्र संस्थानिक होता. त्यानें देवगिरीचा
देवराजा महादेवराय ह्याचे आग्रहावरून झाडीमंडळाचे राजावर
ारी केली होती; परंतु झाडीमंडळाच्या राजानें महादेवरायाच्या
ोबर सलोखा केल्यामुळें एलिचपूरच्या राजास परत जावें लागलें.
ा राजाची व चक्रधराची रस्त्यांत अकस्मात गांठ पडली. चक्रधर
ाचे बरोबर एलिचपूर येथें गेला व त्यानें त्या राजाची कन्या गौरी
जबरोबर विवाह केला. हें चक्रधराचें तिसरें लग्न होय. या लग्ना-
ाही शेवट दुःखपर्यवसायी झाला. अखेर चक्रधरास कायमची
रक्ति होऊन त्याचें लक्ष परमेश्वराकडे वळलें व त्यास श्रीदत्तात्रयाचा
ाक्षात्कार झाला. शके ११८५ च्या कार्तिक महिन्यांत सिंहराशींत
ुरु असतांना त्यानें संन्यास दीक्षा घेतली. महानुभावांचा लीळाचरित्र
ांवाचा धर्मग्रंथ आहे, त्यांत श्रीचक्रधराच्या तीर्थयात्रेची दरएक
दिवसाची नोंद केली आहे असें म्हणतात. ही रोजनिशी प्रसिद्ध
ाल्यास तत्कालीन लोकस्थितीवर बराच प्रकाश पडण्याचा संभव
आहे. या रोजनिशींत श्रीचक्रधरस्वामी शके ११९४ मध्यें बद्रिकाश्रमीं
कायमचा निघून गेले असें म्हटलें आहे. त्याचेबरोबर त्याचा पट्ट-
शिष्य नागदेवाचार्य हा होता परंतु त्यास निराश होऊन परत
यावें लागलें.

या पुस्तकाच्या तिसऱ्या भागांत (पृष्ठें १०० ते ११० मध्यें)

देवगिरीच्या सिंघणदेवाच्या गुजराथेवरील मोहिमेचें सविस्तर वर्ण दिलें आहे. सिंघणदेवाची कारकीर्द शके ११३२ पासून ११६० पर्यं होती, या मोहिमेच्या वेळीं गुजराथचा राजा लवणप्रसाद हा होता त्याला वीरधवल या नांवाचा मुलगा होता. ह्या पितापुत्रांनीं वरी मोहिमेंत पराकाष्ठेचें शौर्य दाखविलें. देवगिरीच्या सिंघणराजानें गुज राथेवर दोन तीन वेळां स्वाऱ्या केल्या असाव्या, असें दिसतें. पहिल्य मोहिमेंत लवणप्रसादानें उत्तरेकडून आलेल्या परचक्रांचा मारा चुक विण्याकरितां मोठ्या मुत्सद्देगिरीनें सिंघणाबरोबर तह करून त्याच स्वारी परतविली. परंतु गुजराथेवरील दुसऱ्या मोहिमेंत सिंघणास विजयश्रीनें माळ घातली नाहीं असें दिसतें. वीरधवलाचा मुलग विशलदेव याचे वेळचा अनहिलपट्टणचा नं. ११ चा ताम्रपट उप लब्ध आहे. त्यांत आपण सिंघणाचा पराभव केला, असे गर्वोक्तीचे उद्गार त्यानें काढले आहेत. हा विशालदेव ( विसलदेव ) गुजराथचे गादीवर शके ११५७ सालीं बसला. या पुस्तकाच्या ११२ पृष्टावर ' विराटपाटी चरित्र ' नामक ग्रंथांतील उतारा दिला आहे. त्यावरून श्रीचक्रधराच्या चरित्रांत ज्या विशालदेवाचा उल्लेख केला आहे, तो व वीरधवलाचा मुलगा विशालदेव हे एकच असावे, यांत शंका नाहीं. अनहिलपट्टणच्या गादीचा खरा मालक भीम ( दुसरा ) असून लवणप्रसादानें वस्तुपाल व जैतपाल या जैन प्रधानांच्या सहाय्यानें त्यास बाजूस सारून गुजराथप्रांताचीं राज्यसूत्रें हस्तगत केलीं होतीं. हा भीम, चालुक्य कुलांतील होता व तो आपणास ' महाराजाधिराज ' असें म्हणवीत असे. लवणप्रसाद हा वाघेला ( व्याघ्रपाली ) या क्षत्रियकुळांतील होता. व तो आपणांस ' राणक ' असें बिरुद लावीत

. कीर्तिकौमुदींत गुजराथच्या चालुक्य राजांचें वर्णन दिलें
न त्यांत वस्तुपाल व जैनपाल ह्या बंधुद्वयांची भरपूर स्तुती केली
हे. वर उल्लेख केलेल्या विशलदेवास हरपाळ या नांवाचा मुलगा
ल्याचें कोठें आढळून येत नाहीं. तसेंच त्रिमलदेव हा गुजराथचा
ा होता, असाही कोठें उल्लेख नाहीं. 'सिंघणदेवाच्या सेनासमु-
स विशलदेवरूपी वडवानळानें सुकविलें' असे गर्वोक्तीचे उद्गार
उल्लेख केलेल्या अनहिलपट्टणच्या ताम्रपटांत विशलदेवानें काढले
हेत. शिवाय कीर्तिकौमुदीवरून भृगुकच्छ ( भडोच, भरवस् ) हें
र लवणप्रसादाच्या अंमलाखालीं होतें असें म्हटलें आहे. यावरून
चक्रधरस्वामींचें पूर्वाश्रमींचें नांव हरपाळ असून तो गुजराथचा
ा विशालदेव याचा मुलगा होता, या हकीगतीस ऐतिहासिक
धार असल्याचें दिसून येत नाहीं. महानुभावपंथाचे सर्व ग्रंथ
द्यापि प्रकाशित न झाल्यामुळें या बाबतींत ठाम मत देणें बाजवी
णार नाहीं. महानुभावीय धर्मग्रंथांत दिलेलें श्रीचक्रधरस्वामींचें
रेत्र ऐतिहासिकदृष्ट्या खरें ठरल्यास, गुजराथ-प्रांताच्या राजपुत्रानें
राठी भाषेचा अभ्यास करून शके बाराव्या व तेराव्या शतकांत
राठी वाङ्मय निर्माण करण्याचा अग्रमान मिळवावा, ही गोष्ट त्या
तास भूषणावह आहे असें म्हटल्या वांचून राहवणार नाहीं.

## महानुभावपंथाची धर्ममतें.

सदरील पंथाचीं धर्ममतें सनातन वैदिक धर्माशीं विसंगत नाहींत.
ीकृष्ण हा पूर्णावतार असून त्याच्याखेरीज अन्य दैवत नाहीं.
ीकृष्णाच्या अतर्क्य लीलांचें व चारित्राचें श्रवण व मनन करून
ाच्याठायीं अढळ निष्ठा ठेवल्यानें मोक्षप्राप्ति सहज होते. यच्चयावत्

प्राणिमात्रांवर दया करणें व अखिल मानवजातींत भेदाभेद न मानणें, असें गौतमबुद्धाप्रमाणें या पंथाचेंही एक तत्त्व आहे. विश्वबंधुत्व व अहिंसा हीं तत्त्वें श्रीचक्रधरानें बुद्ध धर्मांतून घेतलीं असावीं, असें सकृद्दर्शनीं दिसतें. परंतु भागवतधर्मांत ह्या दोन तत्त्वांस प्रमुख स्थान दिलें असल्यामुळें, श्रीकृष्णाच्या उपासनेबरोबर हीं तत्त्वें त्यानें स्वीकारलीं असावीं. मूर्तिपूजा त्यास संमत नव्हती. श्रीकृष्णाखेरीज श्रीदत्तात्रय या देवतेस ते पूज्य मानतात.

श्रीमद्भागवतपुराणांप्रमाणें या पंथांत श्रीकृष्णाच्या उपासने प्राधान्य दिलें आहे. ज्ञान, तप, वैराग्यवगैरे सहाय्यावांचून निव्व भक्तिमार्गानें परमेश्वराशीं सायुज्यता प्राप्त होते, अशी या पंथाची शिकवणूक आहे. श्रुति, स्मृति, आणि पुराणें यांचा उल्लेख आपल्या ग्रंथांत वारंवार करतात. सर्व उपनिषदांचें सार ज भगवद्गीता ती या पंथांतील लोकांस परमपूज्य असून तिज वर संस्कृतांत व मराठींत अनेक टीका या पंथाच्या अनुयायां लिहिल्या आहेत, यावरून महानुभावपंथ हा वैदिक धर्माविरु नाहीं असें दिसतें. भूतदया व विश्वबंधुत्व या उदात्त तत्त्वां महानुभाव पंथाची उभारणी झाली असल्यामुळें वर्णाश्रमधर्म अग चातुर्वर्ण्य त्यांस संमत नाहीं. पूर्वजन्म वगैरे सनातन धर्मांतील तत्त्वें त्यांस मान्य आहेत. आपापल्या कर्मांप्रमाणें स्वर्गाची अथवा नरकाची प्राप्ति होते व मनुष्य पूर्वकर्मानुसार याजन्मीं फळें भोगतो ही तत्वें या धर्मास संमत आहेत. परमेश्वर निराकार व निर्गुण असू तो आपल्या लीलेनें सगुण होतो; माया ही निर्गुणास सगुण

गतें व जीवाला जीवित्व देते; म्हणजे जीवाकडून ती सर्व कर्में विते. अशी त्यांचीं मतें आहेत.

भागवतांतील भिक्षुगीतेंत दिलेल्या आचारव्यवस्थेस अनुसरून चक्रधरानें आपल्या धर्माचा प्रसार करण्यासाठीं भिक्षुसंघाची स्थापना ी; व संघाच्या अंतर्व्यवस्थेसाठीं घालून दिलेली शिस्त उत्कृष्ट रीतीनें टली जावी म्हणून त्यानें कडक निर्बंध घातले. एखाद्या भिक्षूनें र्माचें उल्लंघन केल्यास अगर दुसऱ्याची आगळीक केल्यास त्यास ड़क शासन केलें जात असे. नियमबाह्य वर्तन केल्यामुळें बऱ्याच ंना श्रीचक्रधरस्वामीनें कडक शासन केल्याची अनेक उदाहरणें पंथाचे ग्रंथांत दिलीं आहेत.

महानुभावपंथाच्या मुख्य तत्त्वांचा स्थूलमानानें विचार केला ्तां हा पंथ, भागवतपुराणांतील भागवत धर्माची सुधारलेली वृत्ति होय, असें म्हटल्यास हरकत नाहीं. वैदिक धर्मांत मूर्तिचा कोठेंही उल्लेख आढळत नाहीं. यावरून ती सनातन हिंदुंचें एक मुख्य अंग आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. अहिंसा विश्वबंधुत्व ह्या तत्त्वांचा पुरस्कार भागवत पुराणांत केला असल्याें सद्गलतत्त्वें श्रीचक्रधरानें जैन अथवा बौद्ध धर्मांतून घेतलीं असें णें वाजवी होणार नाहीं. गौतमबुद्धाप्रमाणें श्रीचक्रधरानें पूर्वापार वाट मोडून आपले सर्व धर्मग्रंथ लौकिक ( लोकांच्या नेहमींच्या लण्याच्या ) भाषेंत लिहिण्याचा व आपल्या धर्ममतांचा प्रसार कांच्या भाषेंतून करण्याचा उपक्रम केला ही गोष्ट तत्कालीन विद्वान कांस रुचली नसावी यांत शंका नाहीं. शिवाय, सनातन वैदिकांच्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेस त्यानें कायमची मूठमाती दिली.

वस्तुतः भागवतधर्माच्या श्रेष्ठ तत्वांवर उभारेलला पंथ सर्व लोकांस मान्य व्हावयास पाहिजे होता. वैष्णव व शैव या दोन पंथांपेक्षां, महानुभाव पंथाचे ध्येय व्यापक स्वरूपाचें होतें; असें असतां महानुभावपंथाचा, सनातन धर्मीय अत्यंत तिरस्कार करूं लागले, याचें आश्चर्य वाटतें. याचीं कारणें निरनिराळ्या लोकांकडून वेगवेगळीं दिलीं जातात. जैन व बौद्ध हे धर्मनिरीश्वरवादी असून त्यांची अध्यात्मिक तत्त्वें सनातन वैदिक-धर्माहून कांहीं बाबतींत भिन्न आहेत यामुळें हिंदुधर्मीयांस वरील दोन धर्मांबद्दल आदर वाटत असल्यास त्याबद्दल त्यांना तात्विक दृष्ट्या कदाचित् दोष देतां येणार नाहीं. परंतु हिंदूंनां अत्यंत पूज्य अशा श्रीमद्भगवद्गीता व श्रीमद्भागवत या ग्रंथांतील उदात्त तत्वांवर उभारलेल्या पंथाविषयीं सनातन हिंदुधर्मीयांना तिरस्कार वाटावा हें मोठें गूढ आहे !! महानुभावांचे मराठी भाषेवरील अकृत्रिम प्रेम, त्यांची श्रीकृष्णावरील अचल ऊर्फ अढळ भक्ति, त्यांची अभक्ष्याभक्ष्य-सेवनपराङ्मुखता [ अहिंसा ], त्यांनीं मराठी भाषेंत केलेलीं अमोलिक ग्रंथरचना, तसेंच पंजाबासारख्या दूर प्रदेशांत त्यांनीं केलेला मराठीचा प्रसार, इत्यादि अनेक गोष्टीवरून हा पंथ महाराष्ट्रीयांच्या अत्यादरास पात्र व्हावयास पाहिजे होता. भावे यांनीं आपल्या ‘ महाराष्ट्र सारस्वत ’ ग्रंथांत या प्रश्नाचा व्यापक रीतीनें विचार केला असून सनातनधर्मीयांचें वर्तन याबाबतींत अक्षम्य आहे, असें आपलें स्पष्ट मत दिलें आहे. त्यांतील महत्वाचा उतारा पुढें दिला आहेः––

“ हिंदुधर्म सोडून धर्मांतर केलेला कोणी परधर्मी आमच्या सभांना आणि संमेलनाला अध्यक्ष खपेल, व त्याच्या सटरफटर लेखांचें एक वेळ कोणी कौतुक देखील करील, पण त्याच्यापेक्षां शतपट सुंदर

रचना करणारा व आजन्म मद्यमांसापासून अलिप्त रहाणारा नुभाव त्याठिकाणीं खपणार नाहीं, इतकी ही द्वेषाची मुळी खोल आहे..........कोणीहि इसम आमचें चातुर्वर्ण्य टाकून र्महि सोडून बाहेर गेला तरी त्याचें तें करणें महाराष्ट्र एकवेळ न करील. परंतु आमच्यांत राहून आमच्या चातुर्वर्ण्यावर ात करील तर तें मात्र महाराष्ट्रास खपणार नाहीं."

ौतमबुद्धाप्रमाणें, श्रीचक्रधरानें चातुर्वर्ण्यव्यवस्थाबद्ध हिंदु-ाजावर आघात करून अक्षम्य अपराध केला. चातुर्वर्ण्य हें हिंदु-ाजाचें व हिंदुधर्माचें मर्मस्थान आहे. त्याजवर जो आघात करील, हिंदुधर्माचा कट्टा शत्रु होय. वे. शा. सं. दिवेकर शास्त्री यांनीं ार्यांच्या जातींचें एकीकरण ' या नांवाचें पुस्तक अलीकडे प्रसिद्ध आहे. त्यांत त्यांनीं याच विचारसरणीचा अवलंब केला आहे. कवर्णाश्रम-धर्मास जो धर्म अगर पंथ विरोध करील, तो सनातन दुधर्माचा हाडवैरी आहे असें पक्कें समजावें.

महानुभावपंथांत कांहीं अनीतिवर्धक चालीरीति प्रचलित आहेत, गून हिंदु त्यांचा द्वेष करितात, असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु या गण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हिंदुधर्मांत, घटकंचुकि, वाममार्ग,मुरळ्या, वर्णी वगैरे अनिष्ट प्रकार कालगतीनें घुसडले गेले आहेत तरी त्र अशा मूळ वैदिक धर्मास ज्याप्रमाणें कमीपणा येत नाहीं, प्रमाणें महानुभावपंथांतील भिक्षुणी अथवा भिरखुणी यांजकडून दिवेळीं प्रमाद घडले असल्यास, श्रीचक्रधरानें स्थापिलेल्या ास दूषण देणें वाजवी होणार नाहीं.

महानुभावपंथीय मराठीवाङ्मयाच्या उदयाची व त्याच्या

अव्याहत वाढीची ज्यास पूर्णपणें माहिती करून घेणें असेल, त्य
विनायकराव भावे यांचे 'महाराष्ट्र सारस्वत' व श्रीयुत देशपांडे य
'महानुभावपंथीय मराठी वाङ्मय' हे ग्रंथ अवश्य वाचावे. 'महारा
सारस्वतांत' या पंथाची सविस्तर माहिती दिली असून त्या पंथाच
वाङ्मयाची संक्षेप रूपानें माहिती दिली आहे. भावे यांचा महारा
सारस्वत ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वी, या पंथाचे कांहीं किरकोळ ग्रंथ सो
पूर येथें छापून प्रसिद्ध झाले होते. शिवाय १८९७ सालीं केसरी प
तून महानुभाव पंथाचा व त्यांच्या वाङ्मयाचा इतिहास छापून प्रसि
झाला होता. महंत दत्तराज, महंत हरिराजबुवा वगैरे सुप्रसिद्ध मह
भावीय पंडितांनीं ग्रंथप्रकाशन करण्याचेकामीं आपले धार्मिक पूर्व
बाजूस ठेऊन मोकळ्या मनानें **भावे** यांस मदत केली ही गोष्ट त्य
भूषणावह आहे. भावे यांनीं सदरील पंथाच्या वाङ्मयाचें आस
पूर्वक संशोधन करून व तें प्रकाशित करून महानुभावपंथीयांस
त्याबरोबरच अखिल महाराष्ट्रास व मराठी भाषेचा अभिमान बाळ
णाऱ्या लोकांस कायमचें उपकृत करून ठेविलें आहे. भावे यांनीं अ
कृत केलेलें कार्य, ठाणें येथील मराठीग्रथसंग्रहालयाचे विद्यमान चा
त्यांचे पश्चात् चालवून ठाणेकरांचे लौकिकांत भर घालीत आहेत. ही
समाधानाची आहे. भावे यांनीं आपले हयातींत पंडित दामोदर
'वच्छहरण' व महानुभावपंथीय ग्रंथकारांची व त्यांच्या ग्रंथांची 'स
असे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. कवीश्वर भास्कर यांचें 'शिशुपालवधक
मराठी ग्रंथ-संग्रहालयाच्या विद्यमानें प्रसिद्ध झालें आहे. अ
विद्वान मित्र व व्यवसाय बंधु श्रीयुत यशवंतराव खुशाल देश
यांनीं महानुभावीयग्रंथप्रकाशनाचें कार्य मोठ्या नेटानें चाल

हे. **शारदाश्रम** नांवाची संस्था स्थापून तिच्या द्वारें प्राचीन
ाठीवाङ्मयमाला छापण्याचें काम सदरील संस्थेमार्फत चालू
हे. व थोडक्याच कालांत नरेंद्र कवीकृत ' रुक्मिणी स्वयंवर '
स्कर कवीश्वरकृत ' एकादश स्कंध ' व ' श्रीकृष्णचरित्र (गद्य) '
ग्रंथ छापून तयार होतील, अशी उमेद वाटत आहे. देशपांडे
नीं पंडितनारायण व्यास यांचें ' श्री ऋद्धिपूरवर्णन छापून प्रसिद्ध
े आहे. सदरील ग्रंथ, दामोदर पंडिताचें ' वच्छहरण ' व कवी-
 भास्कर यांचें ' शिशुपालवध या ग्रंथावरून या पंथाचें वाङ्मय
ती श्रेष्ठ दर्जाचें आहे, याची सहज कल्पना करतां येते.

श्रीचक्रधरस्वामींचे पश्चात सुमारें ८०-९० वर्षांनीं, या पंथाचे
ग्रंथ वेदाप्रमाणें गुह्य मानले जावे, असें त्यावेळच्या आचार्यांनीं
रविलें. व तेव्हांपासून महानुभावीय ग्रंथ सांकेतिक अगर गुप्त लिपींत
िहिण्यास सुरवात झाली. पहिल्या सांकेतिक लिपीस ' सकळी
पी ' असें म्हणतात. आणखी कांहीं वर्षांनी सातआठ लिपी
र्माण झाल्या त्याचीं नांवें येणेंप्रमाणें :—( २ ) सुंदरलिपी
३) पारमांडल्य-लिपी (४) अंक-लिपी (५) शून्य-लिपी (६)
मद्रा-लिपी (७) श्री-लिपी वगैरे याचा परिणाम असा झाला कीं,
याला या लिपींची गुरुकिल्ली माहिती नाहीं त्याला हे ग्रंथ वाचणें
शक्य झालें. ही परिस्थिति या पंथाच्या मूळ संस्थापकाच्या
रणाविरुद्ध होती. एका अक्षराऐवजीं दुसऱ्या अक्षराची योजना
रून जी लिपी तयार करतात तिला सांकेतिक लिपी म्हणतात.
पैकीं सकळी, सुंदरी व पारमांडल्य ह्या सांकेतिक लिपींचे कांहीं
मुने खालीं दिले आहेत.

| वालबोध | सकळी | सुंदरी | पारमांडल |
|---|---|---|---|
| अ | स | अ | त |
| इ | षि | उ | दि |
| उ | ह | इ | य |
| क | य | न | १ |
| च | प | झ | ० |
| ट | त | ठ | ३ |
| त | ट | स | व |
| प | च | क | ४ |
| य | क | र | ढ |
| ल | ग | च | ह |
| व | ध | म | स |
| ह | इ | ण | म |

## सुंदरी लिपीचा एक नमुना.

॥ ॥ श्रीझन्य भयारे भवाः ॥ ॥ श्री कंझनुल्पारे भवाः ।

॥ क्षात्रधन्सि मैयाज्ञ अेनु वोझनु अेनु अवोझनुः अेतास्यिमिभ शोभुः सं
अज्ञ म्रासुस्सिः ॥ १ ॥

## वरील उताऱ्याचें देवनागरी लिपींत रूपांतर.

॥ ॥ श्री चक्र धराये नमः ॥ ॥ श्री पंच कृष्णाये नमः ।

॥ ज्ञानभक्ति वैराग्य अेकु मोचकु अेकु अमोचकु अैसा त्रिविध बोधुः ते अन्य
व्यावृत्तिः भागजे ॥ १ ॥

१५७ हा आंकडा महानुभावीय गुप्त लिपींत लिहिण्याची पद्ध
पुढील प्रमाणें:——भूमि–बाण–निधि ‘भूमि’ या शब्दानें १ हा

कड्याचा बोध होतो; 'बाण' यानें ५ या आंकड्याचा बोध
तो ( पंच-बाणस्तु बाणः ); व 'निधि' यानें ७ या आंकड्याचा
ध होतो.

श्रीचक्रधराचा नागदेवाचार्य या नांवाचा एक पट्टशिष्य होता.
स आद्यआचार्य म्हणत. नागदेवाचा शिष्य कवीश्वर व कवीश्वराचा
शुराम अशी आचार्यपरंपरा आढळून येते. परशुरामाचार्यानंतर
पंथांत आपसांत भांडणें सुरू झालीं व त्यामुळें त्यांच्यांत निर-
राळीं तेरा संस्थानें उत्पन्न झालीं. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणेः—
१ ) कवीश्वर ( २ ) उपाध्ये ( ३ ) पारिमांडल्य ( ४ ) अमृते
५ ) मदालसा ( ६ ) कुमार ( ७ ) यक्षदेव ( ८ ) दामोदर
९ ) हरिदेव ( १० ) जयदेव ( ११ ) शालकर ( १२ ) दिवाकर
१३ ) महेश्वर.

महानुभाव पंथांत अस्पृश्य वर्ग खेरीज करून बाकीच्या वर्णांतील
गण्य ही इसमांस संन्यास घेतां येतो व तो महंतपदास चढतो.
टीव्यवहार व बेटीव्यवहार या संबंधानें कोणत्याही प्रकारचे प्रति-
ध या पंथांत नाहींत. संन्यासदीक्षा घेऊन भिक्षावृत्तीनें रहाणें, हा
ष्ठ मार्ग मानला जातो. घरभारी अगर गृहवासी यांस या पंथाचीं
तें पाळूनही संसारांत रहातां येतें. तसेंच सनातन हिंदुधर्मांत
हूनही महानुभाव पंथाविषयीं सहानुभूति दाखविण्यास कोणत्याही
कारची हरकत येत नाहीं संन्यासी हे ३०० पासून ५०० पर्यंत
ेकांचा संघ करून रहातात. संघाच्या मुख्याधिकाऱ्यांस महंत हें
ांव आहे. त्याच्या खालच्या अधिकाऱ्यास **पंडित, कर्परी, पालेकर**
शीं अनुक्रमें नांवें आहेत. भिक्षुणींचे संघ अलग रहातात. भिक्षु-

णीसंघाच्या मुख्य अधिकाऱ्याच्या खालच्या अधिकाऱ्यांस बिडे कराई पंडिताई, भोजनाई व कोठनाई अशीं नांवें आहेत. पट्टधारी यांस अर्घ्य पूजेचा मान असून, याखेरीज छत्र व चामर हीं राजचिन्हें वापरण्याच अधिकार असतो. वनधारी हे जंगलामध्यें फिरतात. जे संन्यास वार्धक्यामुळें देशपर्यटन करण्यास अगर फिरतीवर जाण्यास नालायक असतात त्यांस मलधारी असें म्हणतात. ह्याप्रमाणें या पंथांतील समाज रचना आहे. महानुभावी लोकांपैकीं कोणी मृत झाल्यास त्यास पुरण्याचे चाल आहे. ते काळ्या अगर लाल रंगाची लुंगी परिधान करतात मोंगल बादशहांचे कारकीर्दींत वसविलेल्या ‘ जिझिया ’ कराची त्यांस पूर्ण माफी असे. अवरंगजेब बादशहाकडून मिळविलेल्या सनदें ‘ कोणत्याही हिंदूनीं अगर ब्राह्मणांनीं त्यांस त्रास देऊं नये ’ अशी सक्त ताकीद देण्यांत आली आहे. यामुळें मुसलमानांच्या कृपाछत्रा खालीं या पंथाचे लोक आहेत अशी सार्वत्रिक समजूत झाली व हिंदूंच्या द्वेषास ते पात्र झाले असें म्हणतात.

रामदेवराव जाधव याचे कारकीर्दींत महानुभावपंथीय जे ग्रंथका होऊन गेले त्यांच्या अप्रसिद्ध ग्रंथांतील कांहीं उतारे या ग्रंथाच्य चौथ्या भागांत दिले आहेत. या पंथाच्या वाङ्मयापैकीं आतांपर्यंत जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, त्यावरून त्यांतील भाषा, साहित्य विचारसरणी, प्रसाद, रस, काव्य वगैरेची चांगली कल्पना होते.

‘ **श्रीऋद्धिपूरवर्णन** ’ हें काव्य श्रीयुत यशवंतराव खुशाल देशपांडे यानीं इ. स. १९२९ सालीं प्रसिद्ध केलें. या ग्रंथास देश पांडे यांनीं विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना लिहिली असून त्यांत महानुभाव पंथीयांच्या दृष्टीनें ऋद्धिपूराचें महत्व किती आहे, हें दाखविलें आहे

थात निरनिराळ्या स्थलांचें वर्णन देतानां कवीचें रचनाचातुर्य जागोजाग दिसून येतें. याशिवाय या ग्रंथात प्रसाद, ओज, माधुर्य गुण ओतप्रोत भरलेले आहेत. शिवाय या पंथाचें तत्वज्ञानही रूपानें दिलें आहे. या ग्रंथाचा दुसरा असा विशेष आहे कीं, दुर्बोध शब्दांचा अर्थ सुलभ व्हावा म्हणून त्यांत जागोजाग दिल्या आहेत. या टिपा अलिकडच्या नसून १६ व्या शतकांतील ल्या असें दिसतें. हा ग्रंथ मराठीभाषेच्या दृष्टीनें महत्वाचा . त्यांतील ठळक उतारे संक्षेपरूपानें पुढें दिलें आहेत.

## सरोवर वर्णन.

तया देवऱ्यनना जवळिके: सरोवरें देखे सुलक्षणिकें:
तेथ **टाहुवा** करिति चक्रवाकें: विरह कातरें: ॥ ९१ ॥

निर्दोष निःपाप निर्मळें: वोसंडत परिपूर्ण जळें:
सर्वांगें जालीं वाचाळें: कळखीं पक्षियांचेनीः ॥ ९२ ॥

ठाइं ठाइं बरवटः निवृत्त मंडीत घाटः
जैसे प्रवृत्ति पांथावरि तांबटः तपोनिधिः ॥ ९३ ॥

आपुलेनि प्रसन्नपणें: दृर्शासि मांडीति धरणें:
अमृता आणीति उणें: गोडिया आंगिचियाः ॥ ९४ ॥

जे आंचेनि चरणे पुनंतु: जगीं वाणिजेति तीर्थू:
तो देवराऊजेथू: क्रीडा करीः ॥ ९५ ॥

मंदें मळयानिळें: झगटलें पाणी हालें:
तें मज पां सुखें डोलेः परम पुरुषाचेनिः ॥ ९६ ॥

सकळ शास्त्रां विचारूः करितां नोहेचि निर्धारूः
तो तियें आपेंपरूः लाहातीं जालीः ॥ ९७ ॥

असो हे पोखरणी बावीः जेआ श्रीचरण–कमळें बरवीः
देऊनि गोसावीः बीजे करीतिः ॥ ९८ ॥
कव्हणीं सुक्षेत्र नाहीं ऐसेंः जेथ फीटे भव–पाशेंः
गुणिये आधिष्ठीले हृषीकेशें: ते वांचौनिया ॥ ९९ ॥
ऐसीं पवित्रें परिकरेंः जियें क्रीडा–स्थानें केलीं दातारें
तें तीर्थें पांतां न स्मरेंः आपण पेंः ॥ १०० ॥
नाना तापीं तपतंः हृदय असे जळतः
तें होए शांतः जें देखिलेआः ॥ १०१ ॥

## जीवेश्वर भिन्नत्व दर्शक ओव्या.

आहोजी आइकाः केउता संबंधु रायां रंकाः
ना तरि कृपाळुवांचिया सोइरिकाः निमित्येंवीण ॥ २८१ ॥
देऊ आत्मरमणुः मी कामबाणीं विच्छिन्नुः
देऊ सकुळ सुरशरण्युः मी हीनु बहुतें पाडें: ॥ २८२ ॥
देऊ निजानंदें तृप्तः मी क्षुत्पिपासीं ग्रस्तुः
देऊ अगाधु अलेखु अनंतुः मी अती सोच्यः ॥ २८३ ॥
देऊ परावर नायकुः मी अनादि प्रणीतु रंकु:
देवो मायापर एकु: मी नाना वश्य तीएः ॥ २८४ ॥
देऊ परात्परु तरुः मी आधोगामिया निरंतरुः
देऊ पूर्ण सुखसागरूः मी दुःखग्रस्तः ॥ २८५ ॥
देऊ अप्रेमयू अनिर्वाच्यु: मी अल्प जीव शोच्यू:
ऐसाही दीनु वंच्यूः कहीं नव्हेंचि तुजः ॥ २८६ ॥
असमाना अद्वेताः केवळा घनीभूताः
तुज प्रभु पाहुनि केउताः मीं जीवुः ॥ २८७ ॥
**उच्छळिंध्र** आणि पूर्णचंद्रः वच्छपद कें समुद्रः
पंचानन आणि दर्दुरः जणें पाडेंः ॥ २८८ ॥

शरभा आणि सुपर्णाः का रासभा आणिः ऐरावनाः
पाड कां जैसा हरिचंदनाः पुष्करेंसीः ॥ २८९ ॥
परमाणु के सुवर्णाचलुः चिंतामणिसी हरलुः ×
दैत्य गुरु पाहुनि उजाळुः कांइ शुक्तिखंडे ॥ २९० ॥
चक्रवाहा कां देवेंसीः केंवि कुलाळा करूं सरिसीः
तेंवि तूं जगदात्मा हृषीकेशीः पाहुनि मी जीवु कांईः ॥ २९१ ॥
ऐसा अपाडेंसी हीणुः भवपाशबंध दीनुः
निर्दयो निष्ठुर कृतघ्नुः सर्व दोषियाः ॥ ९२ ॥

## ‘ राजमठ प्रवेशवर्णन ’

तैसा भरला ॐ रसुः करितां मठ प्रवेशुः
तेथ प्रमेय बोलावेया सौरसुः वाचे नाहींः ॥ ३८० ॥
तऱ्हीं आलंकारें वीणः न मिरवे काव्य लक्षणः
रत्नें नव्हाति कां पाषाणः पुन राज्या योग्य कीः ॥ ३८१ ॥
भणौनि शब्द-रत्नां सोहोज्वळाः जाउनि साहित्याचिआ वेलाउळाः
भरौनि आणें खोळाः उन्मेषांचेआः ॥ ३८२ ॥
ग्रंथु सुवर्ण मुद्रिकेंः खेवणु भाव माणिकेंः
मग दरुशना दे ॐ कवतिकेंः श्रीप्रभुरायां ॥ ३८३ ॥
काइ काज एणेंः मठु प्रवेशिजे बोलणेंः
ते अवधारा नारायणु भणेः श्रोतेयांतेंः ॥ ३८४ ॥
व्याधा पासौनि सुटलेंः आतुं पक्षिणीचें पीलेंः
जेवीं निडीं गिर्वासु आलेंः जननिएतेंः ॥ ३८५ ॥
जेवीं असंभवियांचें लेंकरूंः घे पयो पानी हावरूः
तें दैवदत्त क्षीरसागरूः जेंवि लाहेः ॥ ३८६ ॥
साधनांचा चरीतार्थीः जैसी साध्याची प्राप्तीः
नातरि व्याधिग्रस्ता अमृतींः सौरसु लाहेः ॥ ३८७ ॥

जळा बाहीरीं अवचिताः मीन पडे चडफडीताः
तो दैववशें मागौताः जळेंचि लाहेः ॥ ३८८ ॥
तेवि तिए राजभुवनीं: जो आनंद भरला मनीं:
तो कांइ एकी वाचा वाणीः प्राकृत मीं: ॥ ३८९ ॥
संभ्रमाचेनि पुरें: झांपैलीं बुद्धिचीं तीरें:
तो उत्साहो न संवरेः इंद्रिय ॐ घांः ॥ ३९० ॥
मना चांचल्यता न स्फुरेः बुद्धि बोधत्व विसरेः
अहंकारु अहंत्वेसि मुरेः आपणपेंचीः ॥ ३९१ ॥
इंद्रियें चित्रस्थें: जालीं गात्रें स्तिनितें:
हालि चालि कुंठिली जेथें: बाह्याभ्यांतरीं: ॥ ३९२ ॥

.....................................................

## भोजन पक्वान्न वर्णन.

आसन सोरठा उर्णपटीः पुढां मांचळी चौपुटीः
वरि प्रतिष्ठीला ताटीं: वोगरीति नानापरींसीं: ॥ ५०५ ॥
देवा करितां आरोगणः पूर्णचंद्रें लाधलें रवणः
तैसें ताटाचें चोखाळपणः विस्फुर्ति देखाः ॥ ५०६ ॥
सपुर **सोजिएचें** चोखटः फेडुनि सदळ कांठः.
तें कनक वर्ण वेंठः वाढिजति **मांडेयांचे**: ॥ ५०७ ॥
निज किंकरीचिए भुकेः जे वंचिलें वंचकें:
तें पक्वान्न **पोळी** भणौनि जवळिकेः करूंनए ॥ ५०८ ॥
दोहीं मुनै सरिसे सतारः जैसे अमृताचे परांकुरः
ते मध्यें राजाऽअन्नाचे वोगरः वोळगवीतीः ॥ ५०९ ॥

.....................................................

पूर्ण चंद्राचेनि पाडें; वाढिजेति **शिखरणिचे** वडे
रुची छिद्रांचे परि आवडेः सर्वज्ञासिः ॥ ५१२ ॥

दृष्टि चंचल परि एकसरें: जयामाजि वावरे:
वरवा गुंपली कीन मोहरें: कांहीं केलीः ॥ ५१३ ॥
मीटिमीटि स्वर्ग देवाः पाताळीं पीयूषाचा ठेवाः
भणौनि तळौनि काढिला हावाः अमृतरूपः ॥ ५१४ ॥
मोकळी मोतियें जाति पसरींः भणौनि पायसें आळिलि या सरवळीआचीआ
क्षीरीः
वरि पंच धारगौरीः आळंगी चोखाळपणें ॥ ५१५ ॥
सुप्रभा स्नेहवशेंः भीतरि पूर्णत्वें असे:
वाढितां **उदंवरें** सरिसें: पूरिकांसीः ॥ ५१८ ॥
कीं ब्रह्मण्य देवां पुढः ब्रह्मपुरींसीं **मांडे**:
कीं कवचां लेइलीं कोडें: मीपें **पुरिकांचेनिः** ॥ ५१९ ॥
कापुर गौरीं चोखटः छिद्रांचीं परि नव्हे नष्टः
त्रियंच नामधारी बरवंटः ब्रह्मपुरींसीं ॥ ५२० ॥
**गोक्षीर** धार धवळें: भीतरु भरला साकर गुळें:
कीं देवाचिये सन्निधी अमृतफळें: पावतें जालीं ॥ ५२१ ॥
ताटीं तेचि गगनुः वटिका पूर्णचंद्राचें मानुः
भणौनि अमृत फळें तारांगणुः सारिखीं दीसेतिः ॥ ५२२ ॥
नाखिवा माळतिया सळिवें: इत्यादि वळिवट्ट बरवें:
ताटीं वाढिति सदैवें: सेवकजनुः ॥ ५२३ ॥
सोलिवा तीळांचीं तीळुवैं: गोडी मिसळौनि सेवैः
ते **मोदकु** आरोगितां देवें: गुळु थोडा भणे: ॥ ५२४ ॥
बहुतां छिद्रांचियाः कीं सरिया रूपेया चियाः
तिया वाढिती **कुरवंडियाः पर्पटेंसीं**: ॥ ५२५ ॥
नानारुची केलीं उपेणीः कीं पाचि प्रभेची वाणीः
कीं माधुर्यावरि **सांधनीः** अन्ये रसाचीः ॥ ५२८ ॥

दोहीं विभार्गीं कुसंबीरी पत्र शाकेः रूप सस्नेह भर्जिकेः
अभावीं मागिजेति वृथा केः सर्वज्ञ रायेंः ॥ ५३० ॥
सम बुद्धि ईश्वरींः भणाल जवळि एके कां दुरिः
भणौनि **कानवले** थेटरीः भाकरी मागिजति बळेंः ॥ ५३२ ॥
दधि दुधें तक्रेंः कढिया कालवणें विचीत्रेंः
निज दृष्टी होति पवीत्रेः प्रसादा लागिः ॥ ५३५ ॥
कापुर बेलीची चोखडीः उजळिली परीवडीः
तेही सकर्पुरा वीडीः विराजिता श्रीमुखींः ॥ ५४१ ॥
जेंथ लवंग जातीफळ एळाः कात गोळिया सुपरिमळाः
तिआं परतलिया तांबुळाः हात वोडवीती निज किंकराः ॥ ५४२ ॥

शालिवाहनशकाच्या बाराव्या शतकांत महाराष्ट्रांत कोणतीं पक्वानें प्रचारांत होतीं, ह्याचा इतिहास वरील उताऱ्यांत वाचावयास मिळतो. याशिवाय कोशिंबिरी, वडे, पापड, तांबूलविहार यांचाहि उल्लेख या उताऱ्यांत आहे. **बाणाच्या कादंबरींत** व मृच्छकटिक नाटकांत वर्णन केलेल्या पक्वानांची यावरून आठवण होते.

## वच्छहरण.

### वृंदावनाचें वर्णन.

पापिअें न देखतीं वृंदावनः जेथ अखंड असेंति सुरगण ॥
तेथ मोकारा केलासे जनांः दिव्य फल—पुष्पांचां ॥ १३१ ॥
वृंदावनाची सुनीळताः गगंणीसे प्रतिबिंबता ॥
सुमनसें उमटतः ते जैसें तारागणु ॥ १३२ ॥
कां दी असतां तारा न दिसेंः तें ऊणें फेडावेआं दोसें ॥
वनश्रिआ वेढिलें जैसेः अंबरूं नक्षत्रे सीं ॥ १३३ ॥

वनां बाहिरीली आंगीं विशाळः साल ताल तमाल ॥
आंगें जतन करीतें परिमळः ते जैंवी राखणांइजु ॥ १३४ ॥
तेआं भीतरीली ओळीः गगनचुंबितां नारिअेळी ॥
उच्चां तेआं **खर्जुरी** पोफळीः आंदोळतांती ॥ १३५ ॥
तेआं हीं आंतुली आंगींः साकरनिंबोनीं नारंगी ॥
**मधुकाकडियां मातुलंगीः फनसु** गंभीरी ॥ १३६ ॥
वरिखतु रसा चें वडपः तैसें निबिडतरूं द्राक्षिमंडप ॥
उघडिलें माणिका चें मोपः तैसें पक्क **दाळिंबू** ॥ १३७ ॥
कवण गर्णा तें **चंपकः** जेथ असांख्यातु **पाजतिक** ॥
पल्लवीतु दीसती **अशोकः** लक्षसंख्या ॥ १३८ ॥
जेआं केलासीं उमावनीः अमरावतिचिअे चा **नंदन-वनीं** ॥
सकलद्वीपी चिआं वृंदावनींः रायां मुरारी चां ॥ १६० ॥
जेथ सानुरागें सु-मनसेंः मकरंदआस्वादनमिषें ॥
श्रीकृष्ण पावावेआं दी–वसेंः मुनीं षट्पदु जालें ॥ १६१ ॥
जेथ कीडैलु श्रीमंत–सुन्दरूः भणऔनि मळयानील निरंतरू ॥
अनंगु राहिला स-परिवारूः रूपसौभाग्या लागीं ॥ १६२ ॥
वेणुध्वनीं चे ओतवरूः तैसें मकरंदमत्त भ्रमरू ॥
प्रिया तें बोलांवितांतीं द्विजवरूः पंचमालांपीं ॥ १६३ ॥
देखौनी मेघ-सांवळी श्रीमूर्तीः आनंदें मयुरें नृत्यें करीती ॥
शुकसारिका सवादेतिः वेदांतसिध्दान्ती ॥ १६४ ॥
येथें एऔनि वृंदावनांः आडी गातांतीं देवांगणां ॥
तेथ क्षेणु एकु श्रीकृष्णमनाः स्थीराविलें ॥ १६५ ॥
जेथ सदा ऋतु सीं ऋतु-पतीः यक्ष यक्षिणी क्रीडा करींती ॥
वन-देवतां नाचेतीः आनंदभरीतें ॥ १६६ ॥
असो हे शब्दरचनाः वर्णो नेणिजे वृंदावनां ॥
देओ पहावेआं जमुनाः नीगते जालें ॥ १६७ ॥

## नवविधी भक्तीचें वर्णन.

जो सकळविद्यांचें जन्मस्थानः नवां रसां चें निधान ॥
तो वांचौनि सदैवुं कवीजनः आण कांई वाणीतिं ॥ ४९ ॥
जेआं चां बहूंरूप खेळु खेळतांः योगिअें परमसिद्धिं पावतां ॥
ताप-त्रयो निवारितांः सकळजनां चें ॥ ५० ॥
जै देउ रास-क्रीडा खेळींविलाः तै मूर्ती **शृंगारूं** जालां ॥
गौळनीं विनोदें नाचविलाः तै **हास्यरसू** ॥ ५१ ॥
जै जसोदां भेडाविलाः तै **करुणारसू** उठाविला ॥
विखारूं काळिआं जिंतिलाः तै **रुद्रु** जाला ॥ ५२ ॥
मातें श्रीमुखं दाखविलेंः तै **अद्भुतां** सी रूप जालें ॥
विश्वरूपु प्रकटिलेः तै **भयानकूं** ॥ ५३ ॥
जै दैत्यां करी संहारूंः तै **विभत्सु** अणिवारू ॥
**शान्तु** तो निरंतरूंः तेथ चिं असें ॥ ५४ ॥
ऐसें नंवरसुं नाटकुः देउ खेळें जन-मोहकु ॥
निज-रूपु तें ब्रह्मादिकुः ठाउकें न होअे ॥ ५५ ॥

श्रीबोपदेवानें ‘ मुक्ताफल ’ ग्रंथाच्या ११ ते १९ अध्यायांत नवविधा भक्तीचें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे, तें वरील उताऱ्यांत सारांशरूपानें दिलें आहे.

## श्रीकृष्णाच्या नामोच्चाराचें महत्व.

श्रीकृष्णगुणनामी कराल आदरूः तरि तुम्हां तुटैलु संसारू ॥
जैसां दिनकरें अंधकारूंः नासौनि जाअे ॥ ३८ ॥
जैसें तरंगु सागरांः तैसें अनंतावतारूं ईश्वरां ॥
परि लीलां मुंचिजे संसारांः ऐसा एकु श्रीकृष्ण चि होअे ॥ ३९ ॥

आतां सांडा अन्य-भजनें: कां नाइकां वेदपुराणें ॥
सुंचिजे नां आनां कव्हणें: एकु श्रीकृष्णसेवा ॥ ४० ॥
जेआं ची नामें उच्चारितु: नारद ब्रह्मानंदें पावतु ॥
तो ध्वनी आइकौनि देश-धडी होतु: महापातकें ॥ ४१ ॥
कव्हणा हीं जप-तप तीर्थों: यागदानेंव्रतां ॥
कृष्णमहिमे सीं समता: आथी चि ना ॥ ४२ ॥
तीर्थे जन्मेलीं श्रीचरणीं: सकळ देवतां जेआंची करणी ॥
तो कैवल्यनाथु श्रीचक्रपाणी जेसें तोरवें ॥ ४३ ॥
जे अज्ञानतमाची तरणी: कैवल्यपदा चीं निशानी ॥
ते श्रीकृष्णकथा वस्त्राहरणीं: सांघीजेलु ॥ ४४ ॥

शके तेराशेपासून पुढें तीन चारशें वर्षे महाराष्ट्रांतील संत मंड-ळींनीं भगवंताच्या नामोच्चाराचा महिमा याच रीतिनें आपल्या अधिकारयुक्त वाणीनें आपापल्या ग्रंथातून वर्णिला आहे.

## शिशुपालवध कथा.

### मंगलाचरण.

..........................................................

साहित्याचेनि परिमळें: शृंगाराचेनि मेळें ॥
प्रबंधें होती मातावळें: कवी-जनांचे ॥ १५ ॥
एथें नाहीं नवलु: वाणिनां परब्रह्म केवळु ॥
केसें दीसतों बोलु रसाळु: तें आइकावें श्रोता ॥ १६ ॥
मोतियांचें घोषें: रांविलें कुंकुम रसें ॥
तऱ्हीं न एति करीं सरिसें: प्रबंधें सीं ॥ १७ ॥
पांतां प्रमेयांची गोडी: अ-मृता उपजे अ-नावडी ॥
साकरेची कीजे कुरोंडी: कविता लते सीं ॥ १८ ॥

बोलु जेवि सुधारसें घोळिलें: कीं चांदिनां चुभाळिलें ॥
नां ते परिमळें वोंबिलें: चांपे याचेनि ॥ १९ ॥
पढतां श्रीकृष्ण पवाडें: ढिकसां बोलां घोंषु पडें ॥
रस रंगाचें पाहाळ उघडे: श्रोतें यांसीं ॥ २० ॥

### या कथेचें महत्व.

नाते मुक्ती-वनितेची दूतिका: कीं ज्ञानांजनाची शलाका ॥
कीं कैवल्यमंदिरीची पताका: झळकतुसें ॥ ३१ ॥
ना तरी शांतरसें सींपतां: सासीनली ज्ञान-लता ॥
कीं विवेकाची सौभाग्यदेवता: मूर्तिजाली ॥ ३२ ॥
कीं प्रबंधवसंतीची कोकिळा: जीवु-चकोर-संजीवनी चंद्र-कळा ॥
का निम्होळ संसार-वाटेची विश्रामुशाळा: आर्त्तजनां लागी ॥ ३३ ॥
कीं अ-विद्यादुर्गी अवघंडी: अवचितीं मोक्षाची धाडी ॥
भणौनि विंषया चिया नायकु-वाडी पळतां दीसती ॥ ३४ ॥
कीं धर्मकुढावेनि शार्ङ्गपाणी : महापातकांवरी सांघीतली सांघनी ॥
तेवी कथा अंतःकरणी : मजे पढियासली ॥ ३५ ॥
..........................................................

( कवीश्वर-भास्कर )

ज्ञानेश्वरींतील उपमा व उत्प्रेक्षा यांचा नमुना वरील उताऱ्यांत पहावयास मिळतो. ज्ञानेश्वरकालीन वाङ्मयाचा हा एक विशेष आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं.

### द्वारकेचें वर्णन.

तंवं द्वारका देखीनिली: जिआं रूपें अमरावती जिंतिली ॥
चिंतामणीचा राज-भरूं घेतली: अमरावती ॥ ३१६ ॥
जिआं सत्य-लोकु दुहऊं केला: कैलासां पाणी वाहाविला ॥
वैकुंठां गरऊ सांडविला: बरवेंपणां चा ॥ ३१७ ॥

कमळविकाशा पुरतां: जेथ सदां उदैजे सविता ॥
न तपे परौता: बारां हीं मासां ॥ ३१८ ॥
अमृता चेनि वडपें: श्रृंगरा चें दपनें सिंपे ॥
तो चंद्र संपूर्णरूपें: सदा उदे जे ॥ ३१९ ॥
जेथ आनंदरसें दुलनी: अठरां हीं वंशजा जाती ॥
दुमदुमा दावुक वाती: संसारा वरी ॥ ३२० ॥
जेथ पांनां चहूं कडी: आठरां गाउआं बाहीरि वाडी ॥
सुदर्मादित भीतरीनिली वाडी: बारां गांउवें ॥ ३२१ ॥
जेथ सप्त पौळीं: रत्नतेजा ची बाहाळी ॥
उच्चपणें देती कवळी: भूमंडळां सीं ॥ ३२२ ॥
रत्नगिरी चीं विचित्रें शिखिरें: तैसीं आणआणी परि चीं गोपुरें ॥
तेयां भीतरीं रंगे घसेंरः वीरुचूड तो ॥ ३२३ ॥
पुढां कनका चें कळसु देखिलेः जैसें तेजा चें पाह्याल उघडिलें ॥
कीं आधारीं ठाणें घातीनिलें: सूर्य्य बिंबा चें ॥ ३२४ ॥
नीं नि सहस्त्रां हटवटियां: तेयां माजी तेरांशतें ती खणियां ॥
कर्णरियां पांच खणियां: सतरां शतें ॥ ३२५ ॥
एसनी सांधितां रचना: कवताकु होइल मनां ॥
परि करावीसे वर्णना: भीतरील वाडिअें ची ॥ ३२६ ॥
जेथ पांच लक्ष केसरादि: च्यार लक्षें कुंजरादि ॥
ऐसियां सोनेआं चां प्रसादीं: गगणु झांकौळलें ॥ ३२७ ॥
मांडौनि नवरत्नां चें चीरें: उभिलीं नंदजायांदिकें मंदिरें ॥
जिअें घडितां साधुनूक सरें: विश्वकर्मयां चीं ॥ ३२८ ॥
कापुरखाणियां चां हाटीं: घेइजे पोतासा ची पेटी ॥
एकीं तारे साटीं: तुकें विण ॥ ३२९ ॥
कैलासवैकुंठीं जेयां ची सिरियाणी: तिअें रत्नें विकिती कवडेनी ॥
आळांआळिआं चिंतामणी: बोडिअें बचकूं ॥ ३३० ॥

मेणिका तारा उर्वशीः वोळी धर न लहाती कव्हणीं दीर्सी ॥
ते हाटवटी वाणौं कैसीः सामाण्यु वनितां चीं ॥ ३३१ ॥
चालावेआं वैराग्यमंडळांः श्रृंगारें आपुला दाखाळा पाहिला ॥
कवतिकें दाखविलाः मन्मथा सीं ॥ ३१२ ॥
कीं मदना चां मेळींः पूर्णचंद्रा ची नाइकवडी आली ॥
कीं आकाशां इड थांधिलीः कापूर केळी चीं ॥ ३३३ ॥
कीं श्रृंगारा चीं बाणलिंगें: माडा वरीं थापिलीं अनंगें ॥
तैसीं स्त्रीरत्नें दोहीं आंगेंः देखता जाला ॥ ३३४ ॥
नवरत्नां चां चौबरांः पद्मरागा चा लंबोदरा ॥
वाटारंभीं साउंबराः नाचतु दिसें ॥ ३३५ ॥
ऐसें हाट चौहटें पांतुः दळा चेनि धसरें असें जातु ॥
दरणावेआं अनंतुः मंगलमूर्ती ॥ ३३६ ॥
तव देखिलें महाद्वारः जेथ एकवीस खनां चें दामोदर ॥
उभिलें निगुतीं अरुवारः विश्वकर्मेनि ॥ ३३७ ॥
दळ बाहिरी पारुखाविलें: रिगाला सारितु मांदियालें ॥
तंव देखीनिली राउळें: गोपीनाथा चीं ॥ ३३८ ॥
तेथ क्षीरपुरां भ्रांतीः राजहंस स्फटिकांगणें चाटिती ॥
पाइचेआं पूसेआं झेंपावतीः मांजरूं जवादिअे ॥ ३३९ ॥
चंद्रकांता चेयां बाळानेयां वरीः घोंसाळेयां कांकणां चां करीं ॥
नाचवितांति विद्याधरीः मयूरां तें ॥ ३४० ॥
कनककमळां चें चारें वाटितुः मदन ॐकारा सारिखे कूजतु ॥
मुग्धागती विलासां सराऊं देतींः राजहंसां ॥ ३४१ ॥
आंगिचेनि सुगंधपणें: कस्तुरीमृगें सी करौनि साजनें ॥
उमानिती डोळेआं ची वडीलपणें: कृष्णकुमरी ॥ ३४२ ॥
आंगणां चें नि चोखाळपणें: प्रतिबिंबलो तारीगणें ॥
तिअें फुलें भणौनि शिहाणें: वेचों धांवंतीं ॥ ३४३ ॥

पार्जातकां चां उद्यानीं: कृष्णविरहें तातलिआं कामिनीं ॥
निआं विजीजतीं गाभवनीं: कापूर केळीं चा ॥ ३४४ ॥
ऐसीं राउळें पाहिलीं: मग साउमां दृष्टीं सूदलीं ॥
तंवं सु-धर्म्म-सभा देखीनिलीः यादवा.चीं ॥ ३४५ ॥

( कवीश्वर-भास्कर )

## श्रीकृष्णाचें स्तोत्र.

कीं कुंकुमें गर्वालियां: आनंदा चियां कापडगादिया ॥
कीं रंग-दळां चाउरियां: चैतन्या चियां ॥ ३८० ॥
कीं मुक्ती चें वश्यकरण: कीं ब्रम्ह-विद्यें अनुरागा चें ध्यान ॥
कीं चरतें मोक्षनिधान: मोहांधकारीं ॥ ३८१ ॥
जें योगियां चें जीवन: ब्रह्मविद्ये चें जन्मस्थान ॥
तें सुरेख दिसे चिन्ह: पद्ममुद्रे चें ॥ ३८३ ॥
जयां चां देखोनि उमाळा: पळे महामोहा चा पाळा ॥
तो ध्वजू ढळाळा: सरळू दिसे ॥ ३८४ ॥
जरि चैतन्यां पालवीं नीगतीं: वरि तारांगणें फुलेंती ॥
तरि तें नखें उपमीजेती: श्रीकृष्णाचीं ॥
गाजता कलरवीं: अरी वधूचें वैधव्य पदवी ॥
तो तोडरु घवघवीं: वामचरणीं ॥ ३८८ ॥
मुक्ति चिआं पिकां दोपें: ब्रह्मपोटरिआं आलें जैसें ॥
जंघाद्वयें तैसें: गमलें मज ॥३८९ ॥
आनंदा चिआं केळीं: जरि दिसतिआं एकीं वेळीं ॥
तरि मांडियां चीं जाओळीः उपमीजेती ॥ ३९० ॥

( कविश्वर-भास्कर )

## शिशुपालयुद्धवर्णन.

खवळैला कृतांतु डाडाइला: कीं निदुसुरा महाकाळु ओसानाइला ॥
तैसा हिंहिंकारू केला: वारुवें तेणें ॥ १००५ ॥

धालाधाली चें आंग सांधौं कैसेंः चालितां बिंबु न दिसें ॥
वेगां समुद्रीचें तारूं जैसेंः पुआळितु ॥ १००६ ॥
तेयां मुरारी चे सैन्य पालाणिलेंः जैसे मूर्तिसंहारू तेजे वेठले ॥
कीं भूमी जैल लोटलः प्रलय मेघांचें ॥ १०१५ ॥
शौर्यसरितां चा ओघु सुटलाः कीं प्रलयसमुद्रा चा तुंब फूटला ॥
तैसा घसरें निगालाः दळभारूं तो ॥ १०१६ ॥
ढळतु फरारें पताकाः मिळतु चवरें सडका ॥
मांडौ होतसें मृत्युलोकांः कुळाचळ वेन्हीं ॥ १०१७ ॥
जगचवर जगमल्लः रणसोयरे रणबागुल ॥
तोडरराजे तोडरमल्लः खांडे भडाडा ॥ १०२४ ॥
तेथ वाजती शंख काहाळाः तुररिआं तोंडीं खरटिवाळा ॥
डौंडी चीं ढवंस ढोलाः वीरघंटा तांबाकिया ॥ १०२६ ॥
निशान पटहो भेरीः राअ-गिडागिडिआं रणमोहरी ॥
ऐसेंआं वाद्यंत्रां चां गजरींः पातिला रणभूमी तो ॥ १०२७ ॥
रणभूमी चा घाणा करौनि सरिसांः महाकाळु इक्षु गाळीतुसें जैसा ॥
गरगरां आतु भवंतुसे तैसाः दोहीं दळांचा ॥ १०४३ ॥
कीं दळावेआं पृथिवी चां जातांः काळरात्री वैरणें घातलें मजपांतां ॥
तेवि दोनि दळें भिडतांः वीरां चें पीठ झालें ॥ १०४४ ॥
निशानु काहांळां तांबाकिआंः रायगिडागिडि बोबडिआं ॥
वाजतां अंबरूं जाले चिराटिआंः तिअें वेळें ॥ १०५३ ॥
जुझंतां रणीं शीणलेंः शौरें घाई मातलें ॥
हातींचें रुधिरूं पीतांतीं तान्हैलेः तडस भणौनी ॥ १०५६ ॥
चैथे भालेआं ची हुली घातिलीः तिआं देवां ची वज्रांगी फोडिली ॥
अलुमाळु चिरटी गेलीः फुण रुपे दि ना ॥ १०६५ ॥

( कवीश्वर-भास्कर )

## गुरुकृपेचें महत्व.

म्हणे कैं हें बिरडे फिटेल । कैं तो स्वामी भेटेल ।
युगाहूनि वडिल । निमिषमानी ॥ ३७९ ॥
ऐसिया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरुनींचि धाडिलें ।
तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ३८० ॥
कां सुकतया अंकुरा । वरि पडलिया पीयूषधारा ।
ना ना अल्पोदकींचा सागरा । आला मासा ॥ ३८१ ॥
नातरी रंकें निधान देखिलें । कां आंधळिया डोळे उघडले ।
भणंगाचिया आंगा आलें । इंद्रपद ॥ ३८२ ॥
तैसा गुरुकुळाचेनि नांवें । महासुखें अति थोरावें ।
जे कोडेंही पोटाळवे । आकाश कां ॥ ३८३ ॥
पैं गुरुकुळीं ऐसा । आवडी जया देखसी ।
जाण ज्ञान तयापासीं । पाइकी करी ॥ ३८४ ॥
आणि अभ्यंतरिलियेकडे । प्रेमाचेनि पवाडें ।
श्रीगुरुचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥ ३८५ ॥
हृदय शुद्धीचिया आवारीं । आराध्यु तो ध्रुव करीं ।
मग सर्व भावेंसीं परिवारीं । आपण होय ॥ ३८६ ॥
कां चैतन्याचिये पोवळीं । मांजि आनंदाचिया राउळीं ।
श्रीगुरुलिंगा ढाळी । ध्यानामृत ॥ ३८७ ॥
उदयिजतां बोधार्का । बुद्धीची डाळ सात्त्विका ।
भरोनियां त्र्यंबका । लाखोली वाहे ॥ ३८८ ॥
काळशुद्धी त्रिकाळीं । जीवदशा धूप जाळी ।
ज्ञानदीपें वोवाळी । निरंतर ॥ ३८९ ॥
सामरस्याची रससोय । अखंड अर्पितु जाय ।
आपण भराडा होय । गुरु तो लिंग ॥ ३९० ॥

नातरी जीवाचिये सेजे गुरु कांतु करूनि भुंजे ।
ऐसी प्रेमाचेनि भोजें । बुद्धी वाहे ॥ ३९१ ॥
कोणेएके अवसरीं । अनुरागु भरे अंतरीं ।
कीं तया नाम करी । क्षीराब्धी ॥ ३९२ ॥
तेथ ध्येयध्यान बहुसुख । तेचिशेषतुळिकानिर्दोख ।
वरिजळशयन देख । भावी गुरु ॥ ३९३ ॥
मग वोळगती पाय । ते लक्ष्मी आपण होय ।
गरुड होऊनि उभा राहे । आपणाचि ॥ ३९४ ॥
नाभीं आपण जन्मे । ऐसें गुरुमूर्तिप्रेमें ।
अनुभवीं मनोधर्में । ध्यानसुख ॥ ३९५ ॥
एकाधिये वेळे । गुरु माय करी भावबळें ।
मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥ ३९६ ॥
नातरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं ।
गुरु धेनु आपण पाढीं । वत्स होय ॥ ३९७ ॥
गुरु कृपा स्नेह सलिलीं । आपण होय मासोळी ।
कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ३९८ ॥
गुरु कृपामृताचें वडप । आपणसेवावृत्तीचें होय रोप ।
ऐसेसे संकल्प । विजे मन ॥ ३९९ ॥
चक्षुपक्षेंवीण । पिलूं होय आपण ।
कैसें पैं अपारपण । आवडीचें ॥ ४०० ॥
गुरुतें पक्षिणी करी । चारा घे चांचूवरी ।
गुरु तारू धरी । आपण कास ॥ ४०१ ॥
ऐसे प्रेमाचेनि थावें । ध्यानचि ध्यानातें प्रसवे ।
पूर्णसिंधू हेलावे । फुटती जैसे ॥ ४०२ ॥
किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ति अंतरीं ।
भोगी आतां अवधारीं । बाह्यसेवा ॥ ४०३ ॥

**ज्ञानेश्वरी** ( अध्याय ७ श्लोक ३७९ ते ४०३ )

दामोदर पंडित, कवीश्वर भास्कर, नरेंद्र पंडित व ज्ञानेश्वर हे समकालीन होते. कवीश्वर भास्करानें शिशुपालकाव्य शके ११९५ त रचिलें. दामोदर पंडिताचें 'वच्छहरण' शके ११९४ ते १२२६ या सालांचे दरम्यान निर्माण झालें असावें असें **भावे** यांचें मत आहे. नरेंद्रपंडित यांचा उल्लेख पूर्वी येऊन गेला आहे. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शके १२१२त लिहून पुरा झाला. वर दिलेल्या उताऱ्यांवरून या सर्व कवींची काव्यरचनेची शैली एकाच प्रकारची होती असें दिसून येतें. उपमा, उत्प्रेक्षा वगैरे अलंकारांनीं काव्य सजविण्याची दरएकास आवड होती, असें त्यांच्या ग्रंथावरून स्पष्ट दिसतें. वच्छहरणांतील **वृंदावनाचें** वर्णन, शिशुपालवधांतील **द्वारकेचें** वर्णन व ऋद्धिपुरवर्णनांतील **राजमठप्रवेश** वर्णन व **पक्वान्न**वर्णन हीं प्रकरणें फार बहारीचीं आहेत. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अध्यात्मविषयक असल्यामुळें त्यांत वर्णनात्मक भाग क्वचित् दिसून येतो. तथापि अध्यात्मासारख्या गहन व रुक्ष विषयाचें विवरण, उपमा व उत्प्रेक्षा यांच्या योगानें सुलभ करण्याची श्रीज्ञानेश्वराची हातोटी अप्रतिम आहे. हे चार ग्रंथ वाचतांना ते एकाच साच्यातून निर्माण झाले आहेत कीं काय अशी वाचकांस भ्रांति पडते ! परंतु ज्ञानेश्वरीतील मराठी भाषा तत्कालीन महानुभावीय ग्रंथांतील भाषेपेक्षां वेगळ्या स्वरूपाची आहे यांत शंका नाहीं. ज्ञानेश्वरींतील भाषा दुर्बोध वाटते;याचें कारण त्यांत तत्कालीन कोंकणी, खानदेशी ऊर्फ अहिराणी वगैरे भाषांतील शब्दांचा भरणा जास्त दिसून येतो. महानुभावीय ग्रंथांतील भाषा ज्ञानेश्वरीतील भाषेपेक्षां जास्त शिष्ट ऊर्फ नागर असून, तिच्यांत वैदर्भीरीतीची छटा जागोजाग दिसून येते. ज्ञानेश्वरीनंतर, तेरा ते सोळा शतकांत महाराष्ट्रांत जें

वाङ्मय निर्माण झालें त्यांतील भाषा नागर ऊर्फ शिष्ट आहे. चवदा, पंधरा, सोळा या शतकांतील महानुभावीय ग्रंथांचें व त्यांतील भाषेचें स्वरूप कसें होतें, या विषयीं सविस्तर वर्णन श्रीयुत यशवंतराव देशपांडे यांनीं आपल्या महानुभावीय-मराठी-वाङ्मय या ग्रंथांत दिलें आहे. वच्छहरणांतील पुढें दिलेल्या उताऱ्यावरून नागरी बोली ही किती रसपोषक आहे व हिचा काव्यांत उपयोग केला असतां सामान्य जनांचें कसें रंजन होतें, ह्याचें हुबेहुब चित्र दामोदरपंडितांनीं रेखाटलें आहे.

उपमा श्लेष वर्णुकः एहीं रंज ॐ सकळैंकु लोक ॥
कीं पवाडें संसारुमोचकः वाणौ मुकुंदा चे ॥
प्राकृत जण मानवतीः तैसी ॐ ड ॐ कथासंगती ॥
कीं पढौ परब्रह्माची कीर्तीः जें जीवणु संतां चे ॥
नागरीं बोलीं स्छल वाणिजे ः सकल रसां तें पोखिजे ॥
कीं निरसां होऔनि श्रीकृष्णीं भजीजेः यां दों कवणु चांग ॥

ह्यावरून दामोदर पंडिताचे वेळीं म्हणजे बाराव्या शतकाचे अखेरीस मराठी भाषेचे शिष्ट व अशिष्ट असे दोन भाग अस्तित्वांत होते असें दिसून येतें बाराव्या शतकांतील मराठी भाषा इतक्या प्रौढदशेस पोंहोचली होती, यावरून त्याकाळापूर्वी मराठींत मोठ्या प्रमाणावर ग्रंथरचना झाली असलीच पाहिजे यांत शंका नाहीं. हें सर्व वाङ्मय नष्ट व्हावें, हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय! देवगिरीच्या यादवांच्या वेळचे बहुतेक शिलालेख व ताम्रपट संस्कृत अगर कानडी भाषेंत कोरलेलें आहेत. कर्नाटक, म्हैसूर वगैरे प्रांतांत ज्या राजांचा अंमल होता, त्या राजांच्या वेळचे बहुतेक शिलालेख कानडींत आहेत व ते Rice साहेबांनीं छापले आहेत. यावरून कानडी भाषा फार प्राचीन

ाळपासून दरबारी भाषा होती असें दिसून येतें. आतांपर्यंत सिद्ध झालेल्या महानुभावीय ग्रंथांत श्रीकृष्णाचें चरित्र व ाच्या लीला ह्यांसच प्राधान्य दिलेलें आहे. यावरून हें ाङ्मय एकदेशीय आहे, असें दिसतें. श्रीवल्लभाचार्य ह्यांच्या ंप्रदायांत श्रीकृष्णाच्या उपासनेस प्राधान्य दिलें आहे, त्यामुळें ग सांप्रदायाचें वाङ्मय एकदेशीय झालें आहे. निदान या ाबतींत तरी या दोन सांप्रदायाचें परस्पराशीं बरेंच साम्य आहे. सें म्हटल्यास हरकत नाहीं. महानुभाव पंथांतील लोकांनीं आपल्या ंथांची जोपासना विशिष्ट प्रकारानें केल्यामुळें त्यांचें वाङ्मय ंमच्या तसें कायम राहिलें, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

वस्त्रहरण, शिशुपालवध व ऋद्धिपुरवर्णन या ग्रंथांत ‘ ष ’ च्या ऐवजीं ‘ ख ’ चा उपयोग केलेला आढळून येतो. जसें, मनुख (मनुष्य), तोख (तोष), वर्खति (वर्षति) तसेंच ‘ ण ’ च्या ऐवजीं ‘ न ’ चा सर्व ठिकाणीं उपयोग केलेला दिसतो. महानुभाव पंथाचा प्रवेश पंजाबांत पंधराव्या शतकांत झाला व त्या प्रांतांत ह्या पंथाचे बरेच अनुयायी आहेत. पंथाच्या प्रसाराबरोबर मराठी भाषेचाहि प्रवेश तेथें झाला. याप्रमाणें महानुभावपंथीयांनीं महाराष्ट्र भाषेचें निशाण पंजाब व काबूल प्रांतांत मराठी राज्याचा उदय होण्यापूर्वीं शेंदिडशें वर्षें अगोदर फडकाविलें, ही गोष्ट या पंथास अत्यंत भूषणावह आहे, यांत शंका नाहीं. हेमाद्रीच्या हयातींत या पंथाची स्थापना होऊन, त्यांतील ग्रंथकाराकडून थोडक्या काळांत मराठींत मोठ्या प्रमाणावर प्रतिभासंपन्न वाङ्मय निर्माण व्हावें, हें एक ईश्वरी सूत्र होय, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. या पंथांतील संतोष मुनि कृष्णदास यानें शके १४८६

मध्यें ' रुक्मिणी स्वयंवर ' नामक ग्रंथ लिहिला. त्यांत त्यानें ज्ञानेश्वरीच्या धर्तीवर मराठी भाषेची स्तुती केली आहे. त्यांतील उतार पुढें दिला आहेः——

माग व्यासादिकी मुनी ॥ कथा बोलिली ससंस्कृता वानी ॥
ते आता मऱ्हाटीया भाषा करूनी ॥ सांगीजताया ॥ ४१ ॥
अपभ्रंश पीशाच जाने ॥ मागधी आनी सूरसेने ॥
संसकृत प्राकृत या षटवाणी ॥ आनीकी छपन्न भाषा ॥ ४२ ॥
या भाषाचे पाक विस्तार ॥ करावया मऱ्हाटी एक चतुर ॥
तयाचेन प्रसादे जानीजति विचार ॥ सर्व भाषाचे ॥ ४३ ॥
म्हनोनी संसकृताची टीका ॥ मऱ्हाटी म्हनीजताय आईका ॥
जसी हेमाची मुद्रीका ॥ वरी गरूड पाच ॥ ४४ ॥
तैसी छपन्न भाषाचीय मुगटी ॥ शोभे सुहावी सुंदर मऱ्हाटी ॥
आनी संसकृत वाढवीले पोटीं ॥ वागवी पुढा करूनी ॥ ४५ ॥
जैसी स्नेहाळु जननी ॥ अपत्य वागवी करी धरूनी ॥
तैसी षट्भाषा लगुनी ॥ व्यापारवीत असे ॥ ४६ ॥
येने श्रोते कोणते झनी ॥ म्हने ती संसकृत तव देववानी ॥
ती यसी उपमाकारे सानी ॥ दीधली तुवा ॥ ४७ ॥
**मऱ्हाटी स्त्रीलिंग** वाक्य ॥ आनी **संसकृत** तव **नपुसक** ॥
म्हनोनि बाळकत्व आईक ॥ तयासीच साजे ॥ ४८ ॥
ऐसी ते सर्व भाषांची जननी ॥ उत्तम पवित्र मऱ्हाटी वानी ॥
आदि पुरुषें अंगी केली म्हनोनि ॥ अनीवार ब्रीदे जाली ॥ ४९ ॥

अपभ्रष्ट पैशाची, मागधी, शौरसेनी, संस्कृत, प्राकृत, व इतर अनेक छप्पन्न भाषांची जननी मराठी भाषा आहे असें वरील

ऱ्यांत ध्वनित केलें आहे. मुसलमानी राजांच्या अमदानींत
र्शी भाषेंतील बरेच शब्द मराठींत घुसले. महाराष्ट्रभाषेवरील
आपत्ति दूर करण्यासाठीं श्रीशिवाजी महाराजांनीं आपल्या राज-
ांत एक शब्दकोश तयार करविला होता ही गोष्ट सर्वश्रुत आहे.
कै. भावे ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'महानुभावीय कविकाव्यसूचि'-
यं दर्शविलेले सर्व ग्रंथ शारदाश्रमातर्फे प्रसिद्ध करण्याचें काम,
मचे मित्र श्रीयुत यशवंतराव देशपांडे यांनीं अंगीकृत केलें
हे. त्याकामीं त्यांस यश येवो, अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना करून
भाग समाप्त करितों.



## भाग ८ वा.

## हेमाडपंती देवळें.

विष्णुप्रीत्यै चतुर्वर्गचिन्तामण्यामजीगणत् ।
भेदान् व्रतानां दानानां तीर्थाणां मोक्षवर्त्मनाम् ॥
मूर्ति**प्रासाद**पूजानां हेमाद्रिर्गणकाग्रणीः ॥

( बोपदेवाचें " मुक्ताफल

Where towers are crushed and unforbidden weeds
Over mutilated towers shed their seeds,
And temples doomed to milder change unfold
A new magnificence that vies with old.

wordsworth.

वरील संस्कृत श्लोकांत 'प्रासाद' शब्द आहे. हेमाद्री मुक्ताफल ग्रंथावर टीका लिहिली आहे; त्यांत प्रासाद शब्दा अर्थ **देवकुल** म्हणजे **देवालय** असा केला आहे. त्यानें इमार बांधण्याचे पद्धतींत महत्वाच्या सुधारणा करून शिल्पकलेंत क्रां घडवून आणली, अशी परंपरागत समजूत आहे. हेमाद्रि हा सनात वैदिक धर्माचा कट्टा अभिमानी होता, व या धर्माच्या अभिवृध्य त्यानें कसकसे परिश्रम केले, या विषयीं पूर्वी हकिगत येऊन गेल आहे. **चतुर्वर्गचिंतामणी**सारखा ग्रंथ लिहून हिंदुधर्मास काल वशानें आलेली ग्लानि दूर करण्याचें श्रेय त्यानें संपादिलें. याद वांच्या साम्राज्यांत करणाधिपाचे हुद्यावर असतांना हेमाद्रीनें राजा श्रयाचे जोरावर जागोजाग देवालयें बांधून धर्मजागृतीचें का नेटानें पार पाडलें.

नगर, खानदेश, नाशिक व पुणें या चार जिल्ह्यांत, तसेंच ऱ्हाडांत व निझामच्या राज्यांतील कांहीं भागांत 'हेमाडपंती' या पण नावानें संबोधलेलीं असंख्य देवळें अद्याप दृष्टीस पडतात. नाद्रीनें उर्फ हेमाडपंतानें ज्या एका विशिष्ट रीतीनें देवालयें धण्याचा उपक्रम केला, तिला 'हेमाडपंती' हें टोपण नांव डलें. हेमाद्रीच्या पूर्वी भरतखंडांत आर्यावर्त, चालुक्य, द्राविडी ल्लव, कदंब, जैन, बौद्ध, गांधार वगैरे इमारती बांधण्याच्या अनेक द्धति अस्तित्वांत होत्या. ही विशिष्ट नांवें कांहींना देशपरत्वें व ांहींना राजघराण्यांवरून पडलीं आहेत. चालुक्य घराण्याच्या जवटींत इमारती बांधण्याची जी एक विशिष्ट पद्धति प्रचलित होती, त्ला 'चालुक्य' हें नांव पडलें. तसेंच पल्लववंशीय व कदंबवंशीय ाजांच्या अमदानींतील इमारती ज्या विशिष्ट पद्धतीनें बांधल्या ात, त्या अनुक्रमें 'पल्लव' व 'कदंब' या नावांनीं प्रसिद्ध ाहेत. जैनधर्मीयांनीं आपल्या धर्माच्या प्रसारार्थ हिंदुस्थानांत ागोजाग जीं देवळें बांधिलीं, तीं शिल्पशास्त्रदृष्ट्या फार महत्वाचीं ाहेत हीं देवालयें ज्या विशिष्ट पद्धतीनें बांधण्यांत आलीं, तिला 'जैन' पद्धति म्हणतात. अबूच्या पहाडावरील जैनांच्या देवालयां- ील नक्षीकाम इतकें बहारीचें आहे कीं, त्याजबद्दल पाश्चिमात्य शल्पशास्त्रज्ञांस अत्यंत कौतुक वाटतें. या पद्धतीस 'गुजराथी' ासेंही दुसरें नांव केव्हां केव्हां देण्यांत येतें.

भरतखंडांत शिल्पशास्त्र ऊर्फ वास्तुशास्त्र फार प्राचीनकाळीं रिणतावस्थेस पोहोंचलें होतें. या शास्त्रावरील सर्व ग्रंथ संस्कृतांत

लिहिलेले आहेत. कै. वझे यांनीं, स्थापत्यशास्त्रावर संस्कृतांत लि लेल्या कांहीं ग्रंथांचें मराठींत रूपांतर केल्याचें समजतें.

प्रसन्नकुमार आचार्य यांनीं प्राचीन आर्यशिल्पकलेचा इतिह लिहिला असून, या शास्त्रावरील ग्रंथकार व त्यांचे ग्रंथ याची सा स्तर सूचि तयार केली आहे. देवगिरीच्या यादवांच्या अमदान दक्षिणेंत जे प्रख्यात शिल्पकार निर्माण झाले, त्यांपैकीं काहीं नांवें त्यानें दिलीं आहेत तीं येणें प्रमाणें:—कालिदास, जनकाचा (हलेबीड येथील); थाळु (ह्याचें नांव बहाळ येथील शके ११४ च्या शिलालेखांत दिलें आहे.); देवनाग; विधे (थे); देम (अल्हणदेवी येथील शिलालेखांत उल्लेखिलेला), भूतपाल, विमन मान, महीधर, सुभदेव, शूलपाणि (राणक), स्यामल, सिंगायभ झांपून, वगैरे. ह्यापैकीं सिंगायभट्टानें बुक्करायाच्या हुकुमानें कलि पासून **शिखेर**तलावापर्यंत दहा मैल चुनेगच्ची पाणी नेण्याचा न बांधिला होता, असा उल्लेख तत्कालीन ग्रंथांत केलेला आढळतो. य शिवाय प्रसन्नकुमारानें शिल्पशास्त्रीय पारिभाषिक शब्दांचा सविस् कोश तयार केला आहे.

वास्तुशास्त्राचे निरनिराळे भाग असून प्राचीनकाळीं त्यांतीं प्रत्येक भागावर तज्ज्ञांनीं ग्रंथ लिहिले आहेत. ह्यांपैकीं मानसा काश्यप व अगस्ति यांनीं रचिलेलें शिल्पशास्त्र, शुक्रनीति, सु भेदागम, सनत्कुमार-वास्तुशास्त्र, हस्तप्रमाण वगैरे प्रमुख ग्रंथ आहे शिवाय, कांहीं पुराणांत मधून मधून शिल्पशास्त्रासंबंधीं विवेच केलेलें आढळून येतें. भरतखंडांत निरनिराळ्या वेळीं इमारती बांध ण्याच्या ज्या पद्धति प्रचलित होत्या, त्यांचें सांगोपांग वर्ण



हेमाडपंती देवळाच्या पद्धतीचा नकाशा ( ground-plan. )

नन्नकुमारानें लिहिलेल्या शिल्पकलेच्या इतिहासांत आहे. फर्ग्युसन, जेम्स, हावेल, व्हिंसेंट स्मिथ वगैरे आंग्लपंडितांनीं आर्यशिल्पकलेवर ग माहितीनें भरलेले ग्रंथ लिहिले आहेत. ग्रीस, ईजिप्त, अरबस्तान मध्यएशिया या देशांतील शिल्पकलेची छाप आर्यशिल्पकलेवर दसून येते, असें कित्येक आंग्ल-शिल्पशास्त्रज्ञांचें मत आहे. परंतु वरील मत **हॉवेल** या आंग्ल पंडितास संमत नाहीं. आर्यशिल्पकलेचा उगम आर्यधर्माच्या भावनेंत व आर्यसंस्कृतींत झाला, असें हॉवेल साहेबांचें मत आहे. कमळ, त्यांचीं दळें ( पांकळ्या ), कलश, घंटा, बुद्धांचा स्तूप, यांच्या आकारावरून घुमटें, व शिखरें याची मूळ कल्पना निघाली असली पाहिजे, असें आंग्लशिल्पशास्त्रज्ञांचें मत आहे. समुद्रमंथन करतांना त्याच्या उदरांतून निघालेलें ' अमृत ' धन्वंतरीनें कलशांत घातलें म्हणून 'कलश' हा प्राचीन कालापासून पवित्र मानला जातो. पुराणांत ब्रह्मा, विष्णु व लक्ष्मी यांचा कमळाशीं निकट संबंध दर्शविला जात असल्यामुळें **कमळ** पुष्प पवित्र मानलें जातें. तसेंच कमळ, घंटा, व बुद्धांचा स्तूप ह्यांच्या आकारावरून हिंदु कारागिरांनीं घुमटाची कल्पना बसविली, असें हॉवेल साहेबांचें मत आहे. **रामेश्वर** येथील भव्य मंदिर हें द्राविडी पद्धतीचा नमुना होय. ओरिसा प्रांतांतील **भुवनेश्वरमंदिर, परमेश्वरमंदिर, राजाराणीचें मंदिर** व **सूर्यमंदिर**, हीं देवालयें **आर्यावर्त** पद्धतीचे नमुने आहेत. विजयानगर येथील विठ्ठलस्वामींचा मठ हा चालुक्य पद्धतीचा नमुना होय. **द्वारासमुद्र** उर्फ **हलेबीड** येथील देवालयें शिल्पकलेच्या दृष्टीनें फार प्रेक्षणीय असून तीं होयसळ यादवांनीं चालुक्य पद्धतीस थोडाबहुत फेरफार करून बांधिलीं आहेत. देवगिरीच्या यादवांचें राज्य

खानदेश व वऱ्हाड यांच्या सरहद्दीवर असल्यामुळें, हेमाडपंती पद्धतीनें बांधिलेलीं देवालयें तेथें बरींच आढळतात; परंतु या पद्धतीचा विशेष काय आहे, याबद्दल शिल्पशास्त्रावरील प्राचीन संस्कृत ग्रंथांत उल्लेख आढळून येत नाहीं. कै. वझे यांनीं प्राचीन आर्यशिल्पशास्त्राचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता. त्यांसही हेमाडपंती पद्धतीचा सदरील ग्रंथांत मागमूस लागला नाहीं. त्याचप्रमाणें प्राचीन शिल्पशास्त्रांसंबंधीं आंग्ल तज्ञांनीं जे ग्रंथ लिहिले आहेत, त्यांतही या पद्धतीसंबंधानें कांहीं माहिती उपलब्ध नाहीं.

कोणतीहि इमारत बांधण्याच्या कामीं विटांचा व दगडांचा उपयोग करावा लागतो; व ते एकमेकांस घट्ट चिकटून बसले जावे म्हणून चिकणमातीचा किंवा चुन्याचा उपयोग अवश्य करावा लागतो. भूमितिशास्त्राच्या आधारें दगडाचें चिरे, काटकोन, त्रिकोण, चौकोन, वर्तुळ अशा निरनिराळ्या आकाराचे तयार करून ते एकमेकावर कुशलतेनें बसविले असतां चुन्याच्या सहाय्याशिवाय मजबूत व फार वर्षें टिकणारी इमारत बांधतां येते ही कल्पना हेमाद्रीनें काढली अशी सार्वत्रिक समजूत आहे. हेमाडपंती देवळाचीं जीं वर्णनें वाचण्यांत येतात, त्यावरून या घाटाची देवळें, दगडाचे चिरे एकमेकावर अगर एकमेकांत विशिष्ट रितीनें बसवून चुन्याच्या सहाय्यावांचून बांधलेलीं असतात, व तीं फार वर्षें टिकतात असें दिसतें. त्रिकोण, चतुष्कोण, काटकोन, वर्तुळ, अर्धवर्तुळ वगैरे आकाराचे दगडांचे चिरे बनविण्यांत येऊन ते एकमेकांत इतक्या कुशलतेनें बसविले असतात कीं त्यामुळें इमारतीच्या दरएक भागास आधार मिळून त्यावर इमारतीचें छतही बिनधोक राहूं शकतें. याखेरीज इमारती बांधण्याच्या योजनेंत

ील विशिष्ट प्रकार जागोजाग आढळून येतात. बहुतेक देव-
च्या दर्शनी भागीं, भोगमंडपाची ( Portico ) योजना केलेली
सते. तसेंच देवालयाच्या सभामंडपाकरितां वेगळे स्तंभ उभारण्यांत
ऊन, शिवाय त्यांतील दरएक कोपऱ्यांत चारचार खांब चौकोन
धून उभारलेले असतात. देवळाच्या दर्शनी खांबांवर, सभामंडपां-
ल खांबांवर व छतावर पौराणिक काळांतील देवतांचीं चित्रें
रलेलीं असतात. कित्येक ठिकाणीं तर बीभत्स चित्रें कोरून
ष्टाचाराचा भंग केलेला दृष्टोत्पत्तीस पडतो.

शालिवाहनाच्या बाराव्या शतकांच्या अखेरीस व तेराव्या
तकांत दक्षिणेंत जीं देवळें चुन्याच्या सहाय्याविना निव्वळ
गडाच्याच चिऱ्यांनीं बांधिलीं आहेत, व ज्यांना पुष्कळसे कंगोरे
Mouldings ) असून ज्यांच्या बाहेरील व आंतील बाजूस पौराणिक
ाळांतील देवतांच्या मूर्ति कोरलेल्या असतात,त्यांना ‘हेमाडपंती देवळें’
हणण्याचा सर्वसाधारण प्रघात आहे. परंतु हेमाद्रीचे पूर्वीं बांधलेल्या
वालयांतहि ह्या पद्धतीचा थोडाबहुत नमुना पहावयास मिळतो. निलंग
नारायणपूर येथील देवालयें शुद्ध हेमाडपंती पद्धतीचे नमुने होत.
ा पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत पृष्ठ १०१ वर आंबे येथील शिलालेखाचें
र्णन दिलें आहे. तो शिलालेख आंबे येथील जोगाईच्या देवळांतील
ाहे. हें देऊळ शके ११६० पूर्वीं बांधिलेलें असून त्याचा सर्वसाधारण
ाट हेमाडपंती देवळासारखा आहे. हिंदुस्थानांत मुसलमानांचा
मल झाल्यावर ज्या इमारती बांधल्या गेल्या, त्यांत प्राचीन भारतीय
शल्पकलेच्या पद्धतीचा अंगिकार केलेला दिसतो. हिंदु देवतांच्या
ूर्ति खेरीजकरून, नक्षी वगैरेच्या बाबतींत हिंदी कारागिरांनीं

इमारती बांधण्याचें धोरण प्राचीन भारतीय पद्धतीवर ठेविलें होतं असें बऱ्याच आंग्ल संशोधकांचें मत आहे.

या भागाचे अखेरीस, निजामच्या राज्यांतील नीलांग व नाराय पूर येथील हेमाडपंती पडकीं देवळें व त्यांतील नक्षीकाम यांचं छायाचित्रें दिलीं आहेत. नं. अ हा नीलांग येथील देवालया नकाशा ( ground-plan ) आहे. नीलांग हा गांव निजामच्य राज्यांत थेर्णा नदीच्या कांठीं असून एका प्रांताचें मुख्य ठिका आहे. त्या ठिकाणीं हेमाडपंती पद्धतीचें एक शिवालय पडक्य स्थितीत आहे. ह्या देवालयास तीन गाभारे आहेत. त्यापैकीं प्रत्ये कावर एक एक शिखर होतें. हीं तिन्हीं शिखरें देवालयाच्य सभामंडपासुद्धां हल्लीं नष्ट झालीं आहेत. या देवळाचा सभामंडप ३० फूट लांब-रुंद असून चौरस आहे. सभामंडपाच्या दरएक कोपऱ्यां चार खांब, याप्रमाणें एकंदर १६ खांब आहेत. हें देऊळ बांध ण्याच्या कामीं उपयोगांत आणलेला दगड काळा आहे. प्रत्ये गाभाऱ्यास नक्षीदार दरवाजा आहे. मुख्य गाभाऱ्याच्या दरवा जावरील नक्षीकाम फार बहारीचें आहे. नं. ब हें एका गाभ ऱ्याच्या दरवाजाचें छायाचित्र आहे, या दरवाजाची उंच ५ फूट ४ इंच असून रुंदी २ फूट ७ इंच आहे. ह्याचा उंब रठा फार उंच असून त्याच्या मध्यभागाला एक पायरी आहे. य दरवाजावर देवतांचीं चित्रें आहेत, मध्यभागीं देवीचें चित्र कोरं आहे. प्रत्येक दरवाजाच्या खालच्या बाजूस हातांत माणसाची कवट धरलेली अशी शिवाची मूर्ती आहे. मुख्य गाभाऱ्यांत शिवाचें लिं असून, बाकीच्या दोन गाभाऱ्यांत दगडांत कोरलेल्या शिवाच्य

प्लेट ब.



नीलांग येथील हेमाडपंती देवळाच्या गाभाऱ्याच्या दरवाजाचें नक्षीकाम. ( छायाचित्र ).

ीं आहेत. या देवळाच्या चौथऱ्यावर दहाव्या शतकांतील निरगळें कंगोरे ( mouldings ) दाखविले आहेत. व दरएक भाऱ्याच्या दर्शनी-भागास एकेक कोनाडा आहे;व त्यांत निरनिराळ्या तांच्या मूर्ति बसविल्या आहेत. एका कोनाड्यांत अस्थिपंजर महाळीं देवीची मूर्ति असून तिच्या पोटावर विंचू आहे असा देखावा खविला आहे. दुसऱ्या कोनाड्यांत महिषासुरीचें व तिसऱ्या नाड्यांत शिवाचें चित्र आहे. या शिवाय इतर बाजूंवर योगी, प्सरा, वगैरेंची चित्रें आहेत. छायाचित्र नं. ब वरून गाभाऱ्याच्या वाजावरील नक्षीकामाची थोडीबहुत कल्पना येईल.

कल्याण हें शहर चालुक्यांची दक्षिणेंतील राजधानी होती. तेथून ांहीं अंतरावर एका तलावाचे काठीं **नारायणपूर** नांवाचें एक डें आहे. त्या तलावास पूर्वीं घाट बांधलेले असून त्यावर भव्य वळें असावींत, असें दिसतें. हें ठिकाण चालुक्य राजघराण्याचें वित्र ठिकाण होतें. परंतु गेल्या ६०० वर्षांत हें स्थान मुसलमांच्या स्वाऱ्यामुळें बेचिराख झालें आहे. इ. स. १६३५ मध्यें खान गुण ह्यानें हें खेडें हस्तगत करून लुटलें. येथील दोन देवळांचे कांहीं भाग हल्लीं अवशिष्ट आहेत. पैकीं एक जमिनदोस्त झाला आहे. याचा मध्यवर्ति सभामंडप व गाभाऱ्याचा चौथरा मात्र कायम आहे. हें देवालय नीलांग येथील देवालयाचे धर्तीवर असून हेमाडपंती पद्धतीनें बांधिलेलें होतें. काळ्या दगडाच्या चार खांबावर या देवळाचे सभामंडपाची उभारणी काटकोनी, त्रिकोनी अगर चौकोनी, दगडाचे चिरे कुशलतेनें बसवून केली आहे. या देवळाचा घाट बाराव्या शतकांतील देवालयाच्या घाटाप्रमाणें आहे. दुसरें देवालय

साधारण चांगल्या स्थितींत असून त्यावर नक्षीचे काम जास्त केलें आहे. या देवळांतील खांबावर व देवळाच्या बाहेरील भिंतीव नक्षीकाम केलेलें दिसतें; परंतु भिंतीवरील चित्रें बीभत्स आहेत. य देवालयाचा सभा-मंडप खांबावर उभारलेला असून दरएक खांबाचं उंची ९ फूट ६ इं. आहे. या सभामंडपांत जाण्यासाठीं तीन बाजूनं दर्शनी मंडप ( प्रवेशमंडप ) होते. परंतु उत्तर व दक्षिण बाजू कडील मंडप जमिनदोस्त झालेले आहेत. पश्चिम बाजूस देवालयाच गाभारा असून त्यांत शिवाचें लिंग स्थापिलेलें आहे. गाभाऱ्याच्य दरवाजावर मनुष्यांच्या आकृति असून शिवाय वाघ व इतर प्राण्यांचीं चित्रें कोरलेली आहेत. सभामंडपावर छत असून त्याच्य प्रत्येक कोपऱ्यास त्रिकोणाकृति चार चिरे बसविलेले आहेत. दरवाजाच्या दर्शनीपट्टीवर लक्ष्मीचें चित्र खोदलेलें आहे. तिच्या शिरोभागावर मुकुट असून प्रत्येक हातांत कमळाची कळी आहे. नक्षीकाम केलेले दगड आजूबाजूला अस्ताव्यस्त पडलेले आढळून येतात. हें देवालय निव्वळ हेमाडपंती पद्धतीनें बांधिलेलें होतें असें दिसते.

या देवस्थानाची कोणी काळजी न घेतल्यामुळें, त्याच्या भिंतींत जागोजाग झाडें रुजलीं आहेत, व त्यामुळें भिंती ठिकठिकाणीं फाटल्या आहेत. देवालयाचें शिखर पार जमीनदोस्त झालें आहे. नंबर ड छायाचित्रावरून या देवालयाच्या छतावरील नक्षीची कल्पना होते. नं. क हें येथील पडक्या देवळाच्या सभामंडपाचें छायाचित्र होय.

निझाम सरकारच्या राज्यांत पैठण वगैरे ठिकाणीं हेमाडपंती देवालयें बरींच असावीत असें दिसतें, परंतु तीं मूर्तिभंजक मुसलमानांच्या

